राष्ट्रीय चरित्र माला

# रामकृष्ण गोपाळ भांडारकर

एच. ए. फडके

अनुवादिका
मनीषा भट



नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया
नवी दिल्ली

# प्रस्तावना

प्राचीन काळापासून जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात या देशाने थोर व्यक्ती निर्माण केल्या आहेत. कला, वाङ्मय, राजकारण, विज्ञान इत्यादी क्षेत्रांत मोलाची भर टाकणाऱ्या अनेक अलौकिक व्यक्तींच्या नावांनी आपला इतिहास खच्चून भरलेला आहे. काही नावे घरगुती आहेत. असेही अनेक आहेत की ज्यांची नावे परिचित आहेत पण त्यांच्या जीवनाविषयी व कार्याविषयी लोकांना फार थोडे माहीत असते. काही व्यक्ती अशा आहेत की ज्यांच्याबद्दल लोकांना काही माहिती नाही पण त्यांनी फार उल्लेखनीय कामगिरी केलेली आहे.

देशाचा इतिहास म्हणजे बहुतांशी त्या देशातील थोर स्त्री-पुरुषांचा इतिहास, त्यांनीच तो घडविलेला व उभारलेला असतो. आपल्या देशाचा विकास कसा होत गेला हे समजण्यासाठी या व्यक्तींबद्दल सामान्य नागरिकाने काही जाणून घेणे आवश्यक असते.

आपल्या सखोल विद्वत्तेने, सामाजिक व धार्मिक सुधारक म्हणून केलेल्या कार्याने व सत्यावरील निष्ठा आयुष्यभर ठेवूनच रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांनी ' महर्षि ' ही पदवी मिळविली आहे. पाश्चात्य संस्कृतीची छाप पडल्यानंतरच्या संक्रमणकाळात आपला इतिहास घडविण्यात ज्या सुपुत्रांनी प्रामुख्याने भाग घेतला त्यांच्यापैकीच भांडारकर एक होत. दादाभाई नवरोजी व न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे यांच्यासारखा, देशाच्या राजकीय सुधारणांत त्यांनी भाग घेतला नसला तरी जनतेत आपल्या वैभवशाली भूतकाळाबद्दलचा देशाभिमान त्यांनी जागृत केला हेहि काही कमी महत्त्वाचे नाही. पौर्वात्य विद्यांच्या विविध शाखांत त्यांनी केलेली कामगिरी त्यांना थोर युरोपीय पंडितांच्या बरोबरीला आणून ठेवणारी आहे. आपल्या इतिहासविषयक लेखनातून त्यांनी चिरंतन करून ठेवलेला भारताचा वैभवपूर्ण वारसा व व्हिएन्नाच्या प्राच्यविद्या

परिषदेत भारतातील विद्वत्तेची अगाधता तेजस्वीपणे प्रत्ययाला आणून देणे यामुळे त्यांच्या देशवासीयांत बराच आत्मविश्वास निर्माण झाला. अतिशय व्यापक संशोधन व पौर्वात्य विद्याभ्यासातील अस्सलपणा यामुळे त्यांच्या लेखनाला मौलिकता आली आहे. प्रार्थना समाजाचे पुढारी या नात्याने हिंदू धर्मातील उच्चतम तत्त्वांचा त्यांनी पुरस्कार केला. तुकाराम, ज्ञानेश्वर, नामदेव व एकनाथ या संतकवींचा नव्याने अभ्यास करून आणि नव-सुशिक्षितांत या कवींबद्दल बरीचशी अनास्था दिसत असल्याच्या काळात या कवींचे योग्य ते श्रेष्ठपद त्यांना मिळवून देऊन जुन्या मराठी वाङ्मयाच्या बाबतीतहि त्यांनी मोठी कामगिरी बजाविली आहे. निखळ बौद्धिक कार्यक्षेत्रात त्यांचे आदर्श उदाहरण विद्वानांच्या पुढील दोन-तीन पिढ्यांना स्फूर्तिदायक ठरले आहे आणि म्हणूनच या वारसांच्या कृतज्ञभावावर भांडारकरांचा निश्चितच हक्क आहे.

जिच्या पहिल्या अध्यक्षपदाचा मान त्यांना मिळाला ती 'भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिटयूट' आजहि त्यांच्या थोरवीची बोलकी साक्ष देत आहे. प्रामुख्याने प्राच्य संशोधनाला वाहिलेल्या या संस्थेने महाभारताची भव्य अशी चिकित्सक आवृत्ति काढून जगभर नाव मिळविले आहे. शिवाय ही संस्था दर एक वर्षाआड भरवीत असलेली 'ऑल इंडिया ओरिएंटल कॉन्फरन्स' ('अखिल भारतीय प्राच्यविद्या परिषद') भारतातील प्राचीन विद्यांच्या अभ्यासाचे फार मोठे कार्य करते.

उदार निसर्गाने भांडारकरांना ८९ वर्षांचे दीर्घ आयुष्य बहाल केले होते. आयुष्यात अनवद्य असलेल्या भांडारकरांच्या मनात आपल्या संबंधितांबद्दल हळुवार भावना वसत होती. लायक लोकांना व संस्थांना मदत करण्यात ते उदार होते. देशासाठी कष्ट सोसलेल्या लोकांचे त्यांना अमाप कौतुक होते. केसरीतून त्यांच्यावर अनेकदा टीकासुद्धा करणाऱ्या टिळकांबद्दल त्यांना अतिशय आदर व प्रेम होते. शिक्षक, शिक्षणतज्ज्ञ आणि सामाजिक व धार्मिक सुधारक म्हणून त्यांच्या कामगिरीमुळे भारताच्या

पुनरुत्थानाचे ते खरेखुरे प्रतिनिधी ठरतात. लोकांचे धार्मिक व नैतिक कल्याण हा सतत त्यांच्या प्रेमाचा विषय होता. त्यांच्या 'धर्मपर लेख व व्याख्याने 'मध्ये प्रतिबिंबित झालेली धर्मनिष्ठा, प्रामाणिकपणा व नम्रता यांचा न्यायमूर्ती रानडयांनी केलेला गौरव योग्यच आहे : "आमच्या कारकीर्दींत सर्वोत्तम शिकवण आम्ही ज्यांच्याकडून घेतली असे ते एक आदर्श व शिक्षक बनून राहिले आहेत."

या थोर विद्वानाच्या कामगिरीची जाण नसलेल्या सर्वसाधारण वाचकाला त्याने देशासाठी केलेले कार्य समजावे म्हणून, सध्या कुरुक्षेत्र विद्यापीठात इतिहास विभागात असलेले नामवंत विद्वान, डॉ. एच. ए. फडके, यांनी आमच्या मालेत हे छोटे पुस्तक लिहिले आहे.

या मालेचे संपादनकार्य स्वीकारणाऱ्या प्रा. के स्वामिनाथन् व श्री. महेंद्र व्ही. देसाई यांचें आम्ही ऋणी आहोत.

नवी दिल्ली बाळकृष्ण केसकर
२८ ऑगस्ट, १९६८

# अनुक्रमणिका

# १. पूर्वायुष्य आणि शिक्षण

रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांचा जन्म मालवण येथे ६ जुलै १८३७ रोजी झाला. त्यांचे घराणे सारस्वत ब्राह्मणाचे. त्यांचे वडील गोपाळ लाडको हे त्या वेळी तेथे मामलेदार कचेरीत कारकून होते. भांडारकरांचा कोणी एक पूर्वज खजिनदार होता आणि म्हणून हे घराणे भांडारकर या नावाने ओळखले जाऊ लागले अशी एक आख्यायिका आहे. परंतु मालवणमध्ये हे कुटुंब सामान्यतः 'पत्की' या नावानेच सर्वांना माहीत होते. १७९५ मध्ये या घराण्यातील विठ्ठल गणेश यांना मालवणमध्ये जकात-कर वसूल करण्याचे अधिकार देण्यात आले होते. मालवण ही कोल्हापूर संस्थानातील त्या वेळची एक महत्त्वाची बाजारपेठ. धान्याच्या प्रत्येक पोत्यामागे एक पसा[1] धान्य जकात-कर म्हणून काढून घेतले जात असे. या एक पैसा वसूल करण्याच्या अधिकारावरून हे अधिकारी 'पस्की' या नावाने संबोधले जाऊ लागले आणि कालांतराने त्याचे पत्की हे अपभ्रंश रूप झाले. या अधिकाराच्या बदल्यात पत्कींना काही ठराविक रक्कम सरकारला द्यावी लागे. १८१२ मध्ये डनलॉप हा रेसिडेंट असताना ही पद्धत बंद पडली आणि १८१६ मध्ये या घराण्यांना निवृत्ति-वेतन मिळू लागले. भांडारकरांच्या घराण्यालाहि वार्षिक ६० रु. निवृत्ति-वेतन मिळत होते.

भांडारकरांचे आजोबा लाडो विठ्ठल ही गावातील प्रतिष्ठित असामी होती. १८१२ मध्ये मालवण व त्याच्या आसपासचा प्रदेश ब्रिटिश राजवटीखाली आला, त्यावेळी या भागाच्या राज्यकारभारात त्यांची मोठी मदत झाली. शॉ व डनलॉप रेसिडेंट असताना लाडो विठ्ठल यांनी केलेल्या कार्याचा गौरव म्हणून त्यांना काही जमीन इनाम मिळाली होती. या जमिनीची मालकी पुढे भांडारकर घराण्यात चालू राहिली.

---

१. एक माप.

भांडारकरांचे प्राथमिक शिक्षण जरी मालवणलाच सुरू झाले, तरी ते फार काळ तेथे राहिले नाहीत. त्यांच्या वडिलांची बदली राजापूरला झाली व त्यांना वडिलांबरोबर तिकडे जावे लागले. गोपाळरावांना योग्य वेळी महालकऱ्याची बढती मिळाली आणि अखेर ते मामलेदारहि[१] झाले. काही दिवसांनी रत्नागिरीला, हिशेब कचेरीत (अकाउंट्स् ऑफिस) त्यांची बदली झाली. अशा प्रकारच्या जीवनाचा त्या कुटुंबाला जरी त्रास झाला तरी भांडारकरांच्या आयुष्यात ही गोष्ट मोठी महत्त्वाची ठरली. रत्नागिरीसच त्यांना इंग्रजी शिकण्याची संधी मिळाली. यावेळी भांडारकर अवघे दहा वर्षांचे होते.

भांडारकरांच्या इंग्रजी शिक्षणाला १८४७ मध्ये सुरुवात झाली. महाराष्ट्रातील तत्कालीन समाजाची इंग्रजी शिक्षणाकडे काहीशी संशयाने पाहण्याची वृत्ती लक्षात घेता, आपल्या मुलाला इंग्रजी शाळेत घालण्यात गोपाळरावांनी मोठे धाडसच केले होते हे कबूल करावे लागेल.

त्या वेळच्या मुंबई इलाख्यात सामाजिक आणि शैक्षणिक क्षेत्रांत त्या काळात फार महत्त्वाच्या घडामोडी होत होत्या. १८१९ मध्ये, मुंबईचा राज्यपाल म्हणून एल्फिन्स्टनची नेमणूक झाली. त्याच्या शैक्षणिक अहवालामुळे[२] पुढे त्याला प्रसिद्धी मिळाली. या अहवालात मुंबई व पुणे येथे इंग्रजी शाळा स्थापन कराव्यात व त्यांत इंग्रजी दुय्यम भाषा म्हणून शिकविली जावी अशी शिफारस केलेली होती. अलीकडे प्रसिद्ध असलेला शिक्षणासंबंधीचा 'मेकॉलेचा अहवाल'[३] १८३५ मध्ये प्रसिद्ध झाला.

---

१. शासनाधिकारी.

२. दि. ३ डिसेंबर १८२३ च्या आपल्या शैक्षणिक अहवालात राज्यसरकारचे प्रारंभीचे धोरण आणि शिक्षणावरील बंधने, खाजगी संस्था व राज्यसरकार यांच्यांतील सहकार्य व अनुदानाची पद्धत याबाबत एल्फिन्स्टनने काही पद्धत निश्चित केली.

३. मेकॉले लिहितो, "पश्चिम युरोपच्या भाषेने रशियाला सुसंस्कृत केले; तेव्हा त्यांनी (इंग्रजांनी) टार्टर्ससाठी जे केले तसेच ते हिंदूंसाठीहि करतील याबद्दल मला मुळीच शंका नाही."

या अहवालाने पाश्चात्य पद्धतीच्या शिक्षणाची शिफारस केली होती. १८४२ साल उजाडता उजाडता महाराष्ट्रात सर्वत्र इंग्रजी शाळा उघडण्यात आल्या; आणि त्यापाठोपाठ १८५३ मध्ये सर चार्लस वुड यांचा सुप्रसिद्ध खलिता[१] बाहेर पडला.

या सर्व नवीन सुधारणांचा परिणाम म्हणजे रत्नागिरीमध्येहि एक इंग्रजी शाळा निघाली. तेथेच भांडारकरांचे प्राथमिक शिक्षण पुरे झाले. भांडारकरांच्या पूर्वजांचा संबंध किमान शिक्षणाशी पण कधीच आलेला नसतानाहि भांडारकरांमध्ये त्या कोवळ्या वयातच दिसणारी शिक्षणाबद्दलची ओढ व उमेद फार कौतुकास्पद आहे. रत्नागिरीतील आपले शिक्षण संपविल्यावर त्यांनी उच्च शिक्षणासाठी मुंबईला जाण्याचे ठरवले. भांडारकरांमधील या ज्ञानपिपासेमागे परिस्थितीपेक्षा सहजप्रवृत्तीची चाड अधिक होती.

मुंबईमधील 'एल्फिन्स्टन इन्स्टिटयूट' हे त्यावेळचे एक फार मोठे शैक्षणिक केंद्र होय. इथेच बाळशास्त्री जांभेकर आणि दादाभाई नवरोजी काम करीत असत. पुढील काळात न्या. महादेव गोविंद रानडे, न्या. काशिनाथ त्रिंबक तेलंग, फिरोजशाह मेहता आणि मामा परमानंद यांनीहि या नावाजलेल्या संस्थेत[२] शिक्षण घेतले. प्रेमळ स्वभाव, बहुश्रुत विद्वत्ता व त्याहूनहि जास्त उच्च नीतिमत्ता यामुळे दादाभाई नवरोजी ही तेथील सर्वांत लोकप्रिय

---

१. भारताच्या शिक्षणक्षेत्रात हा खलिता मैलाचा दगडच समजला जातो. प्रत्येक प्रांतात शिक्षणशाखेची एक संस्था सुरू करण्याची याने शिफारस केली. या खलित्यातर्फे विद्यापीठाच्या स्थापनेला पाठिंबा मिळाला व शिक्षणाच्या बाबतीत स्थानिक लोकांकडून प्रयत्न होण्यासहि त्यामुळे उत्तेजन मिळाले.

२. एल्फिन्स्टन इन्स्टिटयूटच्या या सुरवातीच्या विद्यार्थ्यांचे वर्णन चंदावरकरांनी 'सप्तर्षी' असे केले आहे ते योग्यच आहे कारण योगायोग असा की ते बरोबर सातजण होते. बाळशास्त्री जांभेकर, दादाभाई नवरोजी, रामकृष्ण गोपाळ भांडारकर, न्या. महादेव गोविंद रानडे, न्या. काशिनाथ त्रिंबक तेलंग, फिरोजशाह मेहता आणि मामा परमानंद, ( स्पिचेस अँड रायटिंग्ज् पृ. ४१० )

व्यक्ति होती. रत्नागिरीच्या शाळेत भांडारकरांच्या वरच्या वर्गात असलेले विश्वनाथ नारायण मंडलिक, एम्. बर्वे, जी. डी. परांजपे हेहि तेथेच दाखल झालेले होते. त्यांच्या लक्षणीय प्रगतीबद्दल ऐकल्यानंतर भांडारकरांनी आपणहि असे नाव कमवायचे असा निश्चय केला. १९१४ सालच्या ' मनोरंजना 'च्या वासंतिक अंकात प्रसिद्ध झालेल्या मुलाखतीत भांडारकर म्हणतात की विश्वनाथ नारायण मंडलिक, नागेश विनायक बापट व फिरोजशाह जहाँगिरशाह तल्यारखान यांच्या प्रगतीच्या अहवालांनी ते खरोखरच प्रभावित झाले. विशेषतः रत्नागिरीच्याच मंडलिकांचे उदाहरण विशेषकरून त्यांच्यासमोर होते.[1]

पाश्चात्य शिक्षण घेण्याच्या त्यांच्या या अनिवार इच्छेला त्यांच्या वडिलांनी प्रोत्साहनच दिले. कारण त्यांनी आपल्या मुलाचे मन जाणले होते व भविष्यकाळात तो काहीतरी विशेष करून दाखवील या विश्वासाने त्यांना समाधानहि वाटत होते. म्हणूनच त्यांनी मुंबईमध्ये भांडारकरांच्या शिक्षणाची तरतूद केली. १८५३ च्या जानेवारी महिन्यात भांडारकर मुंबईला गेले. इथूनच त्यांच्या आयुष्यातील एका नव्या पर्वाचा प्रारंभ होणार होता.

एल्फिस्टन इन्स्टिटयूटच्या माध्यमिक शालाविभागात त्यांना प्रवेश देण्यात आला. पुढच्याच वर्षी (१८५४ मध्ये) ते माध्यमिक शाळेच्या परीक्षेत पहिल्या वर्गात उत्तीर्ण झाले. त्या वेळी शिष्यवृत्त्या दिल्या जात नसत. पण नंतरच्या आपल्या महाविद्यालयीन शिक्षणाच्या काळात भांडारकरांनी अनेक शिष्यवृत्त्या पटकाविल्या. शिक्षणाची अगदी सुरुवात असलेल्या त्या काळात याहून चांगल्या दर्जाची अपेक्षा करणे शक्य नव्हते. १८५५ च्या आपल्या अहवालात शिक्षणसंचालकांनी अशी नोंद केली की, ' शिक्षणाची परिस्थिती अजिबात उत्साहवर्धक नाही. परीक्षेला बसलेल्या विद्यार्थ्यांत फक्त भांडारकरांची उत्तरेच अपेक्षित दर्जाची आहेत. '

---

१. मनोरंजन, वासंतिक अंक, १९१४, कर्नाटकी, ' डॉ. भांडारकर यांचे चरित्र ' पृ. १३.

भांडारकर निर्भीडपणा व सत्यप्रियता यांसाठी प्रसिद्ध होते. या संदर्भात एका मनोरंजक प्रसंगाचे उदाहरण देता येईल. या संस्थेत आल्यावर भांडारकरांनी आपले अत्यंत आदरणीय प्राध्यापक दादाभाई यांच्याकडून गणिताचे पाठ घेतले. यानंतर लौकरच दादाभाईंना इंग्लंडला जावे लागले आणि भांडारकरांच्या वर्गाला तो विषय शिकवण्याचे काम एका युरोपीयन अध्यापकाकडे आले. गणित हा भांडारकरांचा आवडता विषय. नवीन आलेले अध्यापक त्यांचे समाधान करू शकले नाहीत. तेव्हा " सर, माझे गणिताचे ज्ञान अधिक वाढावे या हेतूने मी या संस्थेत नाव घातले, पण आपण माझी निराशा केलीत. " असे त्यांनी ठणकावून सांगितले. हे नवीन आलेले अध्यापक अपात्र होते व त्यांचे गणित शिकविणे खालच्या दर्जाचे होते म्हणून हा प्रसंग घडला. या शेऱ्यामुळे ते अध्यापक चिडले. दुसऱ्याच दिवशी गणितावरची काही दर्जेदार पुस्तके त्यांनी भांडारकरांपुढे टाकली. तरीहि भांडारकरांनी शांतपणे उत्तर दिले, " पण सर, आपण स्वतः जर या पुस्तकांतील उदाहरणे शिकवू शकत नाही तर ती आम्हांला दाखविण्यात काय अर्थ आहे ? " या प्रसंगावरून भांडारकरांचा स्पष्टवक्तेपणा तर दिसतोच, शिवाय गणिताच्या अभ्यासाची त्यांना किती आवड होती हेहि कळून येते. इंग्रजी, इतिहास व तत्त्वज्ञान या विषयांचीहि भांडारकरांना तितकीच आवड होती. परंतु गणिताच्या अभ्यासाची त्यांच्या आयुष्यावर पुष्कळच छाप पडली. अचूक विचार कसा करावा हे या अभ्यासाने त्यांना शिकवले. पुढे प्राचीन भारतीय विद्यांच्या विविध शाखांचा अभ्यास करताना त्यांनी ज्या चिकित्सक व तुलनात्मक पद्धतीचा अवलंब केला त्यातच त्यांच्या गणितातील प्राविण्याच्या व अभ्यासाच्या खुणा सापडतात.

विद्यार्थि दशेतले भांडारकरांचे दिवस फारसे सुखाचे नव्हते. त्यावेळी ते इतके परिश्रम करीत की त्यांना दिवसांतून फक्त सहा तास झोप मिळे. अभ्यास करताना झोप येऊ नये म्हणून भांडारकर आपली शेंडी खुंटीला बांधून ठेवीत. भांडारकर विद्याव्यासंगात गढलेले नाहीत असे कधीच

दिसत नसे. संध्याकाळी फुरसतीच्या वेळीसुद्धा ते आपल्या मित्रांबरोबर सामाजिक किंवा तत्त्वज्ञानावरील विविध प्रश्नांची चर्चा करीत.

त्या काळी विद्यार्थी व शिक्षक यांचे संबंध आदर्श होते. विद्यार्थ्यांच्या केवळ अभ्यासाकडे लक्ष देऊन शिक्षक थांबत नसत, तर त्यांच्या सर्वांगीण विकासाबद्दल ते अतिशय जागरूक असत. साहजिकच विद्यार्थ्यांच्या मनातहि शिक्षकांबद्दल प्रेम व गाढ आदर वसत असे.

सिडने ओवेन या अध्यापकांचाहि भांडारकरांच्या मनावर खोल प्रभाव पडला होता. अतिशय प्रेमळ अशा या अध्यापकांचे प्रत्येक विद्यार्थ्याकडे सारखेच लक्ष असे. होतकरू विद्यार्थ्यांना त्यांनी दिलेले प्रोत्साहन विद्यार्थ्यांत स्फूर्ति निर्माण करीत असे. विद्यार्थ्यांतील उणीवांची नोंद करून त्या नाहीशा करण्यासाठी ते उपाय सुचवीत असत. या अध्यापकांची विचक्षण दृष्टी बुद्धिमान भांडारकरांनी लौकरच वेधून घेतली. ओवेन सत्याचे चाहते होते. एकदा फ्रेंच राज्यक्रांतीवर तास घेत असताना त्या महान घटनेकडे पाहण्याचा एका विशिष्ट इतिहासकाराचा दृष्टिकोण कसा पूर्वग्रहदूषित आहे हे त्यांनी दाखवून दिले. त्यांच्या दृष्टीने ही पद्धत सदोष होती; इतिहासाचा अभ्यास करताना इतिहासकाराने वस्तुनिष्ठ राहून घटनांबद्दल चिकित्सक दृष्टिकोण बाळगायला हवा. ओवेनमधल्या या गुणाचा भांडारकरांवर प्रभाव पडला. कर्तव्याची जाणीव, निर्भयपणा आणि विश्लेषणात्मक व वस्तुनिष्ठ दृष्टिकोण हे सर्व ते या गुरूंकडून शिकले व त्याबद्दल ते त्यांचे अतिशय ऋणी आहेत.

इतर अध्यापकांपैकी दादाभाई नवरोजी, डॉ. ह्युलींग्ज्, डॉ. हार्कनेस व मुख्यत: शिक्षण संचालक हॉवर्ड यांच्यासारख्या नामवंत विद्वानांच्या मार्गदर्शनाचे भाग्य भांडारकरांना लाभले. हॉवर्ड यांचा उल्लेख अवर्जून केला पाहिजे. कारण त्यांनीच भविष्यकाळात भांडारकरांचे आयुष्य घडविले. शिक्षण संचालकाच्या पदावर असल्यामुळे शिकविण्याशी त्यांचा प्रत्यक्ष संबंध जरी आला नाही तरी होतकरू विद्यार्थ्यांबद्दल त्यांना नेहमी आस्था होती. हॉवर्ड यांच्या मार्गदर्शनाचा व मदतीचा फायदा

मिळालेल्या विद्यार्थ्यांतच भांडारकर होते.

इ. स. १८५८ मध्ये एल्फिन्स्टन महाविद्यालयात भांडारकरांनी शिक्षण पुरे केले, काही काळ प्राचार्यांचे साहाय्यक म्हणून आणि नंतर एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूटमध्ये अध्यापक म्हणून त्यांनी काम केले. पुढच्याच वर्षी हॉवर्ड यांनी दक्षिणा फेलोशिपसाठी[१] त्यांची निवड केली. या पदावर मुंबईत काही काळ काम केल्यावर पुण्याच्या, 'पुणे महाविद्यालया'त त्यांची बदली झाली.

१. विद्येला उत्तेजन देण्यासाठी खास दक्षिणा निधि (मानधन किंवा धर्मार्थ दान) राखून ठेवण्याची परंपरा मुळात शिवाजीने सुरू केली. पण पुढे पेशवाईत कोणत्याहि ब्राह्मणाला देण्याचे सर्वसाधारण दान असे त्याचे स्वरुप झाले. शिक्षणसंचालक ई. आय. हॉवर्ड यांनी अध्यासने व शिष्यवृत्त्या निर्माण करण्याची गरज ओळखून सरकारकडून दाक्षिणा निधीसाठी रक्कम आपल्या हाती घेतली. लोकांत शिक्षणविषयक प्रयत्नांना उत्तेजन मिळावे म्हणून या निधीतून त्याने अनेक फेलोशिप्स निर्माण केल्या. म्हणून हे फेलो 'दक्षिणा' या नावाने ओळखले जाऊ लागले, भांडारकर हे पहिले फेलो. ही फेलोशिप पुढे रानडे, याज्ञिक, मोडक, पंडित इत्यादींनाहि मिळाली.

## २. दक्षिणा फेलो

जवळजवळ साडेपाच वर्षे 'भांडारकरांनी 'दक्षिणा फेलो' म्हणून काम केले. या काळात त्यांनी संस्कृतचा सखोल अभ्यास केला. पुढे प्राचीन-भारतीय विद्यांचे एक महान तज्ञ म्हणून त्यांनी केलेले कार्य व मिळविलेली कीर्ति यांची ही पायाभरणीच होती. त्या काळात संस्कृत हा अभ्यास-विषय अजिबात लोकप्रिय नव्हता हे लक्षात ठेवले पाहिजे. महाविद्यालयांत शिकविल्या जाणाऱ्या विषयांत संस्कृतचा समावेश झालेला नव्हता आणि शिवाय भांडारकरांचा मूळचा आवडीचा विषय गणित होता, संस्कृत नव्हे. पुढे जेव्हा त्यांना संस्कृतचीहि तितकीच गोडी लागली तेव्हा गणिती शिस्तीच्या तयारीचा त्यांनी उपयोग करून घेतला. परंपरागत पद्धतीऐवजी त्यांनी चिकित्सक व चौकर पद्धतीचा अवलंब केला. असे सांगतात की भांडारकरांचे परीक्षक मंडलिक हे स्पष्टीकरणासाठी जुन्या मराठी काव्यातील अवघड उतारे घालीत. त्या वेळी वाङ्मयाच्या विद्यार्थ्यांची जुन्या मराठी काव्याशी ओळख नसे. तेव्हा भांडारकर व त्यांचे वर्गबंधू परमानंद, वागळे व मडगावकर यांनी, बाळोबा पाध्यांच्या समर्थ मार्गदर्शनाखाली जुन्या मराठी कवींच्या पद्धतशीर अभ्यासाला सुरुवात केली. त्यानंतर लौकरच प्राचीन भारतीय विद्यांच्या वेगवेगळ्या शाखांच्या अभ्यासाकडे भांडारकर वळले.

फेलो असताना त्यांना जाणीव झाली की भारतीय लोक संस्कृतला देवभाषा मानतात खरे, पण तिच्या शास्त्रशुद्ध अभ्यासाविषयी खरीखुरी आस्था कोणीच दाखवित नाही. हा अभ्यास आजवर केवळ पाश्चात्य विद्वानच करीत आले आहेत. भारतीय विद्वत्तेची ही शोचनीय अवस्था पाहिल्यावर पौर्वात्य विद्येच्या वेगवेगळ्या अंगांचा पद्धतशीर अभ्यास करण्याचे भांडारकरांनी ठरविले.

हॉवर्डला जेव्हा हे कळले तेव्हा त्याला आनंद तर झालाच, शिवाय आपल्या या अतिशय लायक विद्यार्थ्याला सर्वप्रकारची मदत करण्याचेहि

त्याने आश्वासन दिले. भांडारकरांनी मुंबईचे पंडित गोविंदशास्त्री लेले व आप्पाशास्त्री खाडिलकर यांच्या मार्गदर्शनाखाली संस्कृतच्या अभ्यासाला सुरुवात केली; आणि त्यानंतर पुण्याचे सुप्रसिद्ध बाळशास्त्री देव व अनंतशास्त्री पेंढारकर यांच्याकडे पण त्यांनी धडे गिरविले. अशा योग्य व समर्थ शिक्षकांच्या हाताखाली संस्कृतमधील व्याकरण, वेदान्त, न्याय यांसारख्या वेगवेगळ्या शाखांत भांडारकरांनी प्रावीण्य मिळविले. आता पुढचा अभ्यास स्वतंत्रपणे चालू ठेवण्याइतके ते तयार झाले होते.

साधारणत: असे मानले जाते की प्राचीन धर्मग्रंथांचा अभ्यास करणाऱ्यांची एक प्रकारची पारलौकिक वृत्ती तयार होते व दृष्टिकोण संकुचित होतो, पण भांडारकरांच्या बाबतीत हे घडले नाही. कारण सत्यसंशोधनाच्या आपल्या एकमेव हेतूपासून ते कधीहि ढळले नाहीत.

कवी कालिदासाप्रमाणे त्यांचा पुढील तत्वावर विश्वास होता–

" केवळ जुने म्हणून सगळेच जुने काव्य चांगले ठरत नाही, किंवा केवळ नवीन म्हणून एखादे काव्य वाईट ठरत नाही, चांगले टीकाकार योग्य समालोचन केल्यानंतरच यांपैकी कोणत्याहि काव्याचे कौतुक करतात, तर मूर्ख मनुष्य या बाबतीत दुसऱ्याच्या मतावर आपले मत ठरवितो,, [१] कुठे कां असेना पण सत्य जेथे जेथे आढळेल तेथून त्याचा स्वीकार करावयाचा हा भांडारकरांचा आदर्श होता. त्यांच्या या विशिष्ट गुणामुळेच ते दुराग्रही झाले नाहीत. त्यांनी लिहिले आहे, " ज्याला कितीहि लहान प्रमाणात का होईना, सत्याचे दाणे असत्याच्या फोलपटातून निवडून काढण्यात लोकांना मदत करणे शक्य असते, परंतु तो तसे करीत नाही असा मानव प्रत्यक्ष सत्याचा, इतकेच नव्हे तर अखिल मानवजातीचाच गुन्हा करीत असतो. "

---

१. मालविकाग्निमित्रम्, प्रस्तावना, संपादक देवधर.
पुराणमित्येव न साधु सर्वम् । न चापि काव्यं नवमित्यवद्यम् ।
सन्तः परीक्ष्यान्यतरद्भजन्ते । मूढः परप्रत्ययनेयबुद्धिः ॥

२- ' कलेक्टेड वर्क्स् ' खंड १ पृ. ४९५.

मुंबई विद्यापीठाची स्थापना १८५७ साली झाली. नवीन नियमांप्रमाणे विद्यापीठाची पहिली शालान्त परीक्षा १८५९ मध्ये झाली. प्रत्येक फेलोने विद्यापीठाच्या परीक्षा दिल्या पाहिजेत या हॉवर्डच्या नियमांनुसार भांडारकरांना व अनेकजणांना पुन्हा या परीक्षेला बसावे लागले. १८६१ मध्ये ते इंटरची परीक्षा पास झाले; आणि १८६२ मध्ये बी. ए. झाले. जेव्हा यशस्वी उमेदवारांची नावे बाहेर पडली तेव्हा त्यांचे नाव दिसेना. भांडारकरांना आपल्या यशाची खात्री असल्यामुळे त्यांना या गोष्टीचा मोठा धक्काच बसला. आपली फेलोशिप सोडून देण्याची इच्छा त्यांनी प्रदर्शित केली. तेव्हा त्यांचे अध्यापक सर अलेक्झांडर ग्रँट यांनाहि भांडारकरांच्या निकालाचे आश्चर्य वाटत होते. त्यांनी भांडारकरांच्या गुणांची फेरमोजणी करण्याचा आदेश दिला· त्यात असे दिसून आले की गुणांच्या मोजणीत काही चूक झालेली होती. कृष्णाजी बापूजी बाळ व भांडारकर यांच्या गुणांची अदलाबदल झाली होती. ही चूक सुधारली गेली आणि भांडारकर पहिल्या वर्गात यशस्वी झाल्याचे जाहीर करण्यात आले. त्याच वर्षी, म्हणजे १८६२ मध्ये महादेव गोविंद रानडेहि बी. ए. ची परीक्षा पास झाले. भांडारकर दुय्यम भाषा म्हणून संस्कृत घेऊन एम. ए. झाले.

भांडारकर दक्षिणा फेलो होते त्या अवधीत त्यांनी पुण्याच्या डेक्कन कॉलेजमध्येहि थोडेबहुत अध्यापन कार्य केले. ते इंग्रजी, तर्कशास्त्र व तत्त्वज्ञान शिकवीत असत. त्या काळात प्रत्येक शिक्षकाला आपल्या कामाचा वार्षिक अहवाल सादर करावा लागे. १८६४ मध्ये प्राचार्य वर्डस्वर्थ यांना पाठविलेल्या आपल्या अहवालात भांडारकरांनी प्रभावी वृत्तांत दिला आहे. त्यावरून कळते की एका वर्षात भांडारकरांनी गिबनच्या ‘ रोमन लॉ ’ चा काही भाग, शेक्सपियरचे ‘ ज्युलिअस सीझर, ’ मिलचे ‘ लॉजिक ’ व्हाईटलेचे ‘ ईझि लेसन्स ऑन रीझनिंग ’ व थॉमसन, मिल व मॅनसेल यांचे काही ग्रंथ, इतका अभ्यास केला. याशिवाय संस्कृत व्याकरण व मोरोपंतांचे सभापर्व यांचाहि त्यांनी अभ्यास केला. १८६४ मध्ये संस्कृतचे प्राध्यापक डॉ. ह्यूग रजेवर असताना आपल्या नेहमीच्या कामाव्यतिरिक्त

भांडारकरांना संस्कृत शिकवावे लागले व नियमाप्रमाणे त्यांनी आपल्या फेलोशिपचा राजिनामा दिला. त्यांचे काही नामवंत समकालीन, कायद्याच्या अभ्यासाकडे वळलेले असल्यामुळे त्यांनाहि कायदा शिकण्याची उत्सुकता होती. पण नियतीने त्यांच्यासाठी काही वेगळेच लिहून ठेवले होते. सिंध हैद्राबादमधील एका माध्यमिक शाळेचे मुख्याध्यापक म्हणून त्यांची नेमणूक झाली. या वळणानेच त्यांच्या भावी आयुष्याची दिशा जवळजवळ निश्चित केली.

# ३. शिक्षक

मुख्याध्यापक म्हणून भांडारकरांची नेमणूक झाली तीच सर्वार्थाने शिक्षक म्हणून त्यांच्या जीवनाची सुरुवात. काही काळ हैद्राबादेस नोकरी केल्या-नंतर एकदा उन्हाळयाच्या सुटीत ते मुंबईला आले होते. नवीन राज्यपाल सर बार्टल फ्रेअर हा फार भला माणूस आहे, आणि सहाय्यक जिल्हा-धिकारी म्हणून नेमणूक करून होतकरू भारतीयांना मदत करण्याची त्याला कळकळ आहे, असे त्यांनी ऐकले होते. आपली सहाय्यक जिल्हा-धिकारी होण्याची इच्छा भांडारकरांनी हॉवर्डकडे बोलून दाखविली, पण त्याला ही कल्पना मुळीच पसंत पडली नाही. त्याला वाटले की भांडार-करांसारख्या संस्कृतच्या गाढ्या विद्वानाने शासकीय नोकरीच्या भानगडीत पडू नये. शिक्षणखाते हेच त्याचे योग्य स्थान असे त्याने भांडारकरांना सांगितले आणि १८६५ मध्ये रत्नागिरीच्या माध्यमिक शाळेत मुख्या-ध्यापकाच्या जागी त्यांची बदली केली. भांडारकरांना हा क्षण मोठा आनंदाचा व भाग्याचा वाटला, कारण रत्नागिरीतील ज्या संस्थेशी त्यांच्या बालपणाचा व प्राथमिक शिक्षणाचा संबंध होता त्याच संस्थेचे ते आता प्रमुख झाले होते.

त्यांच्या आधीचे श्री. रसेल यांनी शाळेच्या कारभाराची फार शोच-नीय अवस्था करून टाकली होती. शिक्षण संचालकांपर्यंत त्याबद्दलची तक्रार आधीच पोहोचली होती. म्हणून सर अलेक्झांडर ग्रँट यांच्या शिफारशीने, संचालकांनी, भांडारकरांची मुख्याध्यापक म्हणून नेमणूक केली ती सगळया गोष्टी सुरळीत करण्यासाठीच. इतक्या महत्त्वाच्या पदी नेमणूक झालेले भांडारकर हे पहिलेच भारतीय होत. आपल्या नव्या जबाबदाऱ्यांची त्यांना संपूर्ण जाणीव होती. आपल्या निर्दोष अध्यापन-पद्धतीने, आपल्या विद्वतेने, शिस्त व कर्तव्याच्या जाणीवेने थोडयाच दिव-सांत भांडारकरांनी या शाळेला, त्या काळच्या आघाडीच्या संस्थांच्या बरोबरीने आणून बसविले. ते मुख्याध्यापक झाल्यावर पहिल्याच वर्षी,

सर्वच्या सर्व विद्यार्थी शालान्त परीक्षेत उत्तीर्ण झाले. पुढच्या वर्षी त्यांच्या विद्यार्थ्यांपैकी यशवंत वासुदेव आठले याने पहिला वर्ग मिळविला व जगन्नाथ शंकर शेट ही कांक्षित शिष्यवृत्ति पटकाविली. भांडारकरांच्या रत्नागिरीतील कारकीर्दीत (१८६५–१८६८) हा मान त्यांच्या शाळेला दोनदा मिळाला. संस्कृत शिकविण्याच्या बाबतीत या संस्थेचा लौकिक इतका मोठा होता की भांडारकर संस्था सोडून गेल्यावरहि तेथील विद्यार्थी हा बहुमान मिळवीतच राहिले. या काळात भांडारकरांनी आपले संस्कृतचे दुसरे पुस्तक पुरे केले. पहिले पुस्तक १८६४ मध्ये दक्षिणा फेलो म्हणून काम करीत असताना त्यांनी प्रकाशित केले होते. आजहि भारतात, सर्वत्र ही पुस्तके संस्कृतच्या अभ्यासाचा श्रीगणेशा करणाऱ्यांसाठी मान्य पाठ्य-पुस्तके म्हणून समजली जातात. भांडारकरांना कीर्ति संपादन करण्यास ही पुस्तके पुरेशी होती.

इ. स. १८६६ मध्ये मुंबई विद्यापीठाने भांडारकरांना संस्कृतचे परी-क्षक नेमले. त्याचवर्षी त्यांचे विद्यार्थी काशिनाथ त्रिंबक तेलंग (नंतरचे न्यायमूर्ती तेलंग) उमेदवार म्हणून बसले. त्यांच्या उचित व चुणचुणीत उत्तरांनी, त्यांच्या अध्यापकांना त्यांच्या भावी थोरपणाबद्दल वाटत असलेला विवास सार्थ असल्याचे पटवून दिले.

शिक्षकांची नेमणूक करताना भांडारकर विशेष काळजी घेत. शिक्षकाचे आपल्या विषयावर पूर्ण प्रभुत्व तर हवेच पण त्याचवेळी त्यांच्याजवळ उच्च नीतिमत्ता हवी असे भांडारकरांचे स्पष्ट मत होते. ज्यांच्याजवळ हा गुण नाही ते, शिक्षकाच्या पेशाला अयोग्य होत असे त्यांचे म्हणणे होते. शिक्षक म्हणून भांडारकरांचे आपल्या विद्यार्थ्यांशी असलेले संबंध पूर्णपणे समान-तेवर आधारलेले होते. ब्राह्मणवर्गात संस्कृतचा अभ्यास व्हावा यासाठी भांडारकर प्रोत्साहन देत; त्याचबरोबर ब्राह्मणेतरांनीहि ही भाषा शिकावी असे त्यांना वाटे. ब्राह्मणेतरांपैकी रामचंद्र विठोबा धामनसकर हा त्यांचा आवडता विद्यार्थी होता. तोच पुढे बडोदा संस्थानाच्या दिवाणपदापर्यंत चढला. भांडारकरांच्या मते संस्कृत शिकविण्याच्या पौर्वात्य पद्धतीत खास

तिची अशी एक उपयुक्तता होती. ज्याला संस्कृतचा विद्वान व्हायचे असेल त्याला त्या विषयाची चांगली समज हवी आणि त्या भाषेवर पूर्ण प्रभुत्व हवे. यासाठी भांडारकरांनी शाळांतून जुन्या, परंपरागत शास्त्र्यांची नेमणूक करण्याची शिफारस केली.

भांडारकरांचा आपल्या विद्यार्थ्यांवरील प्रभाव फार मोठा होता आणि ते त्यांच्या नितांत आदराला पात्र झाले होते अशी नोंद तपासणीसाठी फिरतीवर आलेल्या सर अलेक्झांडर ग्रँट यांनी केली आहे. उन्हाळ्याची सुट्टी सुरु होण्याच्या आदल्या दिवशी भांडारकर आपल्या विद्यार्थ्यांना उद्देशून भाषण देत व जीवनविषयक वेगवेगळ्या समस्यांवर त्यांच्याशी बोलत. अशा प्रसंगीच त्यांचे आपल्या विद्यार्थ्यांवरील प्रेम व त्यांच्या नैतिक आणि भौतिक प्रगतीची त्यांना असलेली तळमळ उघडपणे जाणवत असे, आपल्या रत्नागिरीतील वास्तव्यात, भांडारकरांनी संगीताचेहि धडे घेतले. मुलात धार्मिक वृत्ति असल्यामूळे त्याचा उपयोग त्यांनी कुटुंबात प्रार्थना म्हणताना करून घेतला. ' मद्भक्ताः यत्र गायन्ती ' (जेथे माझे भक्त गात असतात) हा त्यांचा आवडता श्लोक होता. आपल्या धार्मिक प्रवचनांत ते नेहमी तो अद्धृत करीत.

इ. स. १८७३ ते ८२ या काळात ते मुंबई विद्यापीठाच्या कार्यकारी मंडळाचे सभासद होते. ही मुदत संपल्यावर त्यांनी आपले सभासदत्व चालू ठेवावे म्हणून तिथल्या सहकाऱ्यांनी आग्रह धरला, पण न्यायमूर्ती काशि-नाथ त्रिबक तेलंग यांच्यासाठी भांडारकरांनी राजिनामा दिला. भांडार-करांची आपल्या विद्यार्थ्यांबद्दलची आस्था यातून दिसून येते. विद्यार्थ्यांना वर येण्याची संधी देता यावी असे त्यांना नेहमीच वाटे.

इ. स. १८६९ मध्ये डॉ. बुह्लर दीर्घ मुदतीच्या रजेवर इंग्लंडला गेले. मुख्याध्यापक म्हणून रत्नागिरीला साडेतीन वर्षे काम केल्यावर भांडार-करांची बदली करण्यात आली व मुंबईला एल्फिन्स्टन महाविद्यालयात बहूलर यांच्या जागी त्यांची नेमणूक झाली. १८७२ मध्ये डॉ. बुह्लर परत आले तरी ते आपल्या पूर्वींच्या अधिकारावर आले नाहीत. त्यांना

बढती मिळून ते तपासनीस झाले. त्यामुळे भांडारकरांना संस्कृतचे प्राध्यापक म्हणून काही काळ काम करण्याची संधी मिळाली. तरीहि १८७२ मध्ये कायम प्राध्यापकाच्या जागेच्या नेमणुकीची वेळ आली तेव्हा भांडारकरांच्या अग्रक्रमाकडे संपूर्णपणे दुर्लक्ष करून व नियमांना न जुमानतां ही नेमणूक केली गेली. वरिष्ट अधिकाऱ्यांनी भांडारकरांना डावलून डॉ. पीटरसन यांना नेमले. बाकी हे काही फारसे वेगळे घडत नव्हते म्हणा ! कारण वरिष्ठ पदांवरील नेमणुकींच्या बाबतीत भारतीयांवर अन्याय करण्याची ब्रिटीश वसाहतदारांची पद्धतच होती. भांडारकरांच्या संबंधितांना याचा मोठा धक्काच बसला. पीटरसनच्या स्मृतीला भांडारकरांनी जी श्रद्धांजली वाहिली त्यात वरील घटनेसंबंधीच्या त्यांच्या भावना व्यक्त झाल्या आहेत. त्यांनी लिहिले आहे, "१८७३ च्या जानेवारीत मला बाजूला सारण्यासाठी डॉ. पीटरसन यांना आणण्यात आले. १८६९ च्या सुरवातीपासून १८७२ च्या अखेरपर्यंत, चार वर्षे, मी एल्फिन्स्टन महाविद्यालयात पौर्वात्य भाषांचा प्राध्यापक म्हणून काम करीत होतो. डॉ. पीटरसन हा पंचविशीतला तरुण. माझ्याहून दहा वर्षांनी लहान ! गेली पंधरा वर्षे मी संस्कृत शिकत व शिकवित आलो होतो. पीटरसन यांनी हा अभ्यास फार तर गेली पाच एक वर्षे केला असेल."[१] परंतु आपल्या व डॉ. पीटरसन यांच्या संबंधात अविश्वास, संशय किंवा मत्सराच्या भावना भांडारकरांनी येऊ दिल्या नाहीत. उलट त्यांच्यातील नाते जिवाभावाच्या मित्रांचे होते. आणि डॉ. पीटरसन यांच्या मृत्यूपर्यंत ते तसेच टिकून राहिले.

डॉ. पीटरसन यांच्या नेमणुकीमुळे भांडारकरांसमोर खरोखर मोठा पेच निर्माण झाला. एक विद्वान व्यक्ति व शिक्षक म्हणून त्यांच्याबद्दल चांगले मत असलेले प्राचार्य चॅटफील्ड नसते तर भांडारकर रत्नागिरीच्या माध्यमिक शाळेतील आपल्या पूर्वीच्या मुख्याध्यापकाच्या जागी परत गेले असते.

---

१. 'कलेक्टेड वर्क्स', खंड १ पृ. ५२३-२४.

पीटरसनच्या हाताखाली संस्कृतचे सहाय्यक प्राध्यापक म्हणून भांडारकरांची नेमणूक करण्यासाठी त्यांनी प्रयत्न केले. १८८२ पर्यंत ते या पदावर राहिले. या काळात भांडारकर अतिशय कार्यमग्न होते, १८७४ मध्ये लंडनच्या प्राच्यविद्या परिषदेत भांडारकरांनी एक लेख सादर केला. १८७५ मध्ये 'इंडियन अँटिक्वेरी' मध्ये त्यांनी अनेक लेख लिहीले, शिवाय त्याच वर्षी 'विल्सन भाषाशास्त्रीय व्याख्यानमालेत' त्यांनी एक व्याख्यानमाला गुंफली, १८७९ साली त्यांच्या सुप्रसिद्ध 'रिपोर्ट ऑन दि सर्च ऑफ संस्क्रित मॅन्युस्क्रिप्ट्स्' (संस्कृत हस्तलिखितांच्या संशोधनाचा अहवाल') चा पहिला भाग बाहेर पडला.

इ. स. १८८२ मध्ये एक नवाच वाद उपस्थित झाला. पुण्याच्या 'पुणे महाविद्यालया'तील संस्कृतचे प्राध्यापक डॉ. किलहॉर्न निवृत्त झाले आणि एका जर्मन प्राध्यापकाला त्या जागी नेमण्याचा विचार सरकारच्या मनात आला. कल्पना अशी की, डॉ. पीटरसन यांना एल्फिन्स्टन महाविद्यालयात इंग्रजीचे प्राध्यापक म्हणून नेमावे व पूर्वी भांडारकरांचा जेथे हक्क डावलला गेला होता ती संस्कृतच्या प्राध्यापकाची जागा त्यांना द्यावी. पण पीटरसन आपली जागा सोडण्यास नाखूष दिसल्यामुळे सरकारपुढे मोठा पेच निर्माण झाला. या वेळी भांडारकरांचे नावाजलेले विद्यार्थी न्यायमूर्ती तेलंग यांनी भांडारकरांचा पक्ष लढविला. मुंबईच्या सुशिक्षित लोकांत उमटलेली चीडहि वर्तमानपत्रांतून व्यक्त झाली. हा विरोध एवढा प्रखर होता की सरकारला त्यापुढे नमावेच लागले व पुणे महाविद्यालयात संस्कृतचे कायम प्राध्यापक म्हणून भांडारकरांची नेमणूक करावी लागली. १८९३ पर्यंत त्यांनी हे काम केले.

आयुष्यभर भांडारकरांनी अध्यापन कार्याला वाहून घेतले. विद्यार्थ्यांच्या जवळजवळ तीन पिढ्या शिकविल्या आणि म्हणूनच 'गुरुवर्य' हे विरुदहि त्यांना देण्यात आले.

कालिदास म्हणतो, " आपली कला स्वत: प्रकट करण्यात एखाद्याचे श्रेष्ठत्व असते तर एखाद्याचा विशेष गुण—आपले कौशल्य दुसऱ्यापर्यंत

पोहोचविण्याचे सामर्थ्य–हा असतो. मात्र जिच्याजवळ हे दोन्ही गुण आहेत त्या व्यक्तीला शिक्षकांमध्ये अग्रस्थान द्यायला हवे."[१] खरोखर या आदर्शा नुसार भांडारकरांच्यात एक गाढा विद्वान व एक आदर्श शिक्षक यांचे गुण एकवटलेले होते. न्यायमूर्ती काशिनाथ त्रिंबक तेलंग, एल. आर. वैद्य, जी. एच्. देशमुख, वामन शिवराम आपटे व देवदत्त रामकृष्ण भांडारकर यांच्या-सारख्या तेजस्वी विद्वानांच्या परंपरेचा पाया घालण्यास तसेच सर्वसाधारण पौर्वात्य विद्या आणि आधुनिक संस्कृत विद्वत्ता याबाबतीत मुंबई इलाख्याला अग्रस्थान मिळवून देण्यास नेमक्या याच गुणांनी भांडारकरांना हातभार लावला. आदर्श गुरू कसा असावा याचे भांडारकर हे एक उत्तम उदाहरण होते. लायक विद्यार्थ्यांना त्यांनी उत्तेजन दिले व मदत केली. विद्यार्थ्यांना उत्कृष्ट शिक्षण मिळाले पाहिजे असे त्यांचे मत होते. विद्यार्थ्यांचे उच्चार अचूक व स्पष्ट असावेत यावर, संस्कृतचे अध्यापक या नात्याने त्यांनी विशेष भर दिला. आपल्या देशाच्या प्राचीन संस्कृतीचा त्यांनी अभिमान बाळगला पाहिजे आणि त्याचबरोबर त्यांच्याजवळ उच्च नीतिमत्ताहि असली पाहिजे असे त्यांचे मत होते. स्वतःच्या आयुष्यात या तत्त्वांचे भांडारकरांनी पालन केले आणि तसे करणाऱ्यांवर त्यांनी प्रेम केले. विद्यार्थ्यांना त्यांच्या उणीवा दूर करण्यासाठी मदत करण्याचा त्यांनी कधीच कंटाळा केला नाही. प्रसिद्ध कवी भवभूतींच्या शब्दांत सांगायचे तर त्यांची वागणूक ' वज्रादपि कठोरानि मृदूनि कुसुमादपि ' (वज्राहून कठोर व फुलांहून कोमल) अशी होती.

त्यांची बुद्धी आणि अंतःकरण या गुणांची प्रशंसा, त्यांच्या विद्यार्थ्यांकडून अनेक वेळा केली गेली. व्ही. एम्. महाजनींचा विविधज्ञानविस्तारातील लेख, प्राचार्य भाटे यांचा जुलै १९१७ सालचा ' फर्ग्युसन कॉलेज मॅगझिन '-मधील लेख, नरसिंहराव दिवेटिया यांचा सप्टेंबर १९२५ साली प्रसिद्ध

१. मालविकाग्निमित्रम्, अंक १, श्लोक १६—संपादक मोरेश्वर रामचंद्र काळे
शिष्टा क्रिया कस्यचिदात्मसंस्था संक्रांतिरन्यस्य विशेषयुक्ता।
यस्योभयं साधु स शिक्षकाणां धुरि प्रतिष्ठापयितव्य एव॥

झालेला ' एल्फिन्स्टोनियन 'मधील लेख आणि दामोदर गणेश पाध्ये यांचा ' सुबोध पत्रिके 'तील लेख यांचा यात समावेश होतो. संस्कृत अभ्यास-विषयक विविध शाखांचे चांगले जाणकार म्हणून भांडारकरांची बरीच ख्याति होती. त्यांची शिकविण्याची पद्धत प्रभावी आणि तरीहि साधी होती. या चिकित्सक, तशाच तुलनात्मक पद्धतीने त्यांनी विद्यार्थ्यांना अचूक विचार करायला शिकविले. भांडारकरांच्या वैयक्तिक वागणुकीत कुठेहि बोट ठेवायला जागा नव्हती. त्यांची कमालीची कर्तव्यदक्षताच त्यातून दिसून येई. प्रथम वर्ष कलेच्या परीक्षेत आपला मुलगा श्रीधरपंत याला पारितोषिक न देता ते त्यांनी दिवेटियांना दिले. १८९९ मध्ये जेव्हा त्यांचा मुलगा देवदत्त रामकृष्ण भांडारकर, एम. ए. च्या परीक्षेला बसणार होता तेव्हा भांडारकरांनी आपण परीक्षक म्हणून काम करू शकणार नाही असे विद्यापीठाला कळविले. ' बालादपि सुभाषितं ग्राह्यम् ' (योग्य उप-देश लहान मुलाकडूनहि घ्यावा) ही म्हण ते आचरणात आणीत. ' न्हानुं ' या गुजराथी शब्दाच्या व्युत्पत्तीबाबत त्यांचे विद्यार्थी दिवेटिया यांनी दुरुस्ती सुचविली याचा त्यांनी आपल्या पुस्तकात कृतज्ञतापूर्वक उल्लेख केला आहे. त्यांच्या विद्वत्तेप्रमाणेच त्यांचे ग्रंथालयहि मोठे होते. त्यात पुष्कळ दुर्मिळ पुस्तके व हस्तलिखिते होती. त्यांचा सल्ला घेण्यासाठी व पुस्तके नेण्यासाठी जे लोक भेटायला येत त्यांची नोंद भांडारकर करून ठेवीत. त्यांच्या रोजनिशीत नोंदविलेल्या अशा व्यक्तींत बाळ गंगाधर टिळक, हरी नारायण आपटे व काथवटे हे होते.

भांडारकरांचे विद्यार्थी दामोदर गणेश पाध्ये यांनी त्यांच्या उदात्त गुणांबद्दल काढलेले गौरवोद्गार इथे उद्धृत करणे हे समर्पक ठरेल. " शिक्षक व प्राध्यापक म्हणून भांडारकरांच्या विविध गुणवैशिष्टयांच्या जोडीला महत्त्वाची गोष्ट अशी होती की डॉक्टरांच्या पायांशी बसून धडे गिरविताना विद्यार्थी लौकरच प्रेम व मार्दवाच्या वातावरणात वावरू लागे; आणि ज्या वेधक व्यक्तिमत्त्वाने भांडारकरांना घडवले आहे त्याचे चित्र पूर्ण करायचे तर त्यांच्या काळाचे ते ' गुरू ' होते. विद्यार्थ्यांच्या

प्रेमाला व आदरालाहि पात्र झालेले, व ज्यांची मूर्ती नेहमीच विद्यार्थ्यांनी अतिशय हळव्या भावनेने हृदयात साठविली असे गुरू !... वसिष्ठ, विश्वामित्र व इतर पूर्वकालीन पूज्य ऋषी, जे आपल्या परिचयाचे झाले आहेत, त्यांच्या जातकुळीतील एक ' महर्षी !' आपल्या विद्यापीठात ज्या प्रकारचे आदर्श प्राध्यापक असावेत अशी आपली उत्कट इच्छा असते, पण जे आपल्याला फार क्वचित भेटतात, त्या प्रकारच्या प्राध्यापकांचा ते खरोखर नमुना होते.[१]

१ श्रीनिवास नारायण कर्नाटकी, ' डॉ. भांडारकर यांचे चरित्र, ' पृष्ठ ७२—७३.

# ४. शिक्षणतज्ञ

शिक्षणक्षेत्रातील भांडारकरांची कामगिरीहि काही कमी मोलाची नाही. मुंबई विद्यापीठाने परीक्षक, फेलो व सभासद, कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष अशा वेगवेगळ्या भूमिकांवरून शिक्षक व विद्यार्थीवर्गासाठी त्यांनी कार्य केले. १८९३ मध्ये त्यांची उपकुलगुरू म्हणून नेमणूक झाली. १८९५ पर्यंत ते त्या पदावर होते. भारतीय असल्यामुळे कुलपतिपदापर्यंत त्यांना चढता आले नाही. तरीहि १९१६ मध्ये प्रा. धोंडो केशव कर्व्यांच्या महिला विद्यापीठात कुलपति म्हणून त्यांनी काम केले. या काळात पाठ्यक्रम व अभ्यासशाखा या संदर्भातील शैक्षणिक सुधारणांशी त्यांचा संबंध होता. १८७० मध्ये सर अलेक्झांडर ग्रँट, डॉ. बुल्लर व डॉ. किलहॉर्न यांच्या प्रयत्नांनी अभ्यासक्रमात संस्कृत व लॅटिन या भाषांचा समावेश झाला. या महत्त्वपूर्ण निर्णयाशी भांडारकरांचा संबंध होता. मुंबई विद्यापीठाशी त्यांचा संबंध असल्यामुळेच आधुनिक संस्कृत पंडितांच्या परंपरेसाठी विद्यापीठाला अखिल भारतीय दर्जा लाभला. १८९१ मध्ये आपले मित्र न्यायमूर्ती तेलंग यांच्यासह त्यांनी, इतिहास, राजकीय अर्थशास्त्र व नैतिक तत्त्वज्ञान यांचा साधारण अभ्यासक्रमात पुन्हा समावेश करून घेण्याची धडपड केली. अभ्यासक्रमात इतिहासाचा समावेश करून घेण्यात ते यशस्वी झाले. हप्तेवार शिक्षणपद्धतीच्या ते विरुद्ध होते व या संदर्भात बंगालच्या गुरुदास बानर्जींचे उदाहरण ते देत असत. १९०२ मध्ये लॉर्ड कर्झनने नेमलेल्या विद्यापीठ मंडळाचे सभासद म्हणून त्यांनी या पद्धतीविरुद्ध विरोधपत्र दिले होते.

विद्यार्थ्यांना सर्वोत्तम शिक्षण मिळाले पाहिजे व त्यानुसार त्यांच्या परीक्षाहि उच्च दर्जाच्या असल्या पाहिजेत असा, शिक्षणतज्ञ या नात्याने भांडारकरांचा दृष्टीकोण होता. आयुष्यात स्थिरस्थावर झाल्यानंतरसुद्धा अध्ययन चालू ठेवण्याचा व लोकांच्या उत्कर्षासाठी कार्य करण्याचा उपदेश त्यांनी आपल्या विद्यार्थ्यांना केला. कार्यकारी मंडळाच्या सभासदांनी शैक्षणिक

प्रश्नांना राजकीय छटा देऊ नयेत असे, एक सभासद म्हणून त्यांचे मत होते. सर फिरोजशाह मेहता यांच्याबरोबर त्यांची एकदा प्रखर चर्चा झाली होती. केवळ भांडारकरांचे वजन असल्यामुळेच मुंबई विद्यापीठाच्या प्रमुख कार्यवाहाच्या जागी असलेल्या नालायक माणसाची पुन्हा त्या पदी नेमणूक होण्याचे टळले. हा मनुष्य युरोपीय असल्यामुळे या बाबतीत बराच दबावहि आणला गेला होता, अशी नोंद त्यांच्या रोजनिशीत[1] आढळते. अशा माणसाचा हा पराभव विद्यापीठाच्या उत्कर्षाची कळकळ असलेल्या भारतीयांकडूनच अखेर केला गेला.

**भांडारकर आणि शिक्षणसमिती :**

'हंटर शिक्षणसमिती'ला[2] (१८८४) भांडारकरांनी केलेल्या शिफारशीं-वरून ते एक फार मोठे शिक्षणतज्ज्ञ होते हे स्पष्ट होते. " देशातील पाश्चात्य शिक्षणाला उत्तेजन देण्यासाठी सरकारने आखलेल्या योजनांचे परिणाम पाहणे व त्याचा अहवाल सादर करणे " यासाठी या समितीची स्थापना झाली होती. या क्षेत्रात सरकारचा प्रवेश म्हणजे मिशनऱ्यांना आपल्या राखीव क्षेत्रावरील अतिक्रमण वाटले. तेव्हा त्यांनी आवाज उठविला की सरकारने यात प्रत्यक्ष भाग घेण्यातून आपले अंग काढून घेतले पाहिजे आणि आपल्या संस्था खाजगी चालकांच्या हाती दिल्या पाहिजेत. ही माघार घेणे कुठल्या मर्यादेपर्यंत योग्य ठरेल हे निश्चित करण्याचेहि काम समितीकडे होते.

पाश्चात्य शिक्षणाचा भारतीयांना बराच उपयोग झाला हे जरी समि-तीला मान्य असले तरी देशी पद्धत बंद करण्याला तिने पाठिंबा दिला नाही, तर त्या पद्धतीला उत्तेजन व मदतीची शिफारस केली. तिने पुढे असे

---

१. तारीख १४-१२-८९; कर्नाटकी, 'डॉ. भांडारकर यांचे चरित्र', पृ. ९८.

२. हिचे अध्यक्ष सर विल्यम हंटर यांच्या नावावरुन ही समिती या नावाने साधारणतः ओळखली जाते. मुंबई इलाख्यासाठी अहवाल तयार करण्याचे काम ज्यांच्या-वर सोपविले होते त्यांच्यात भांडारकरांचे विद्यार्थी न्यायमूर्ती तेलंगहि होते.

म्हटले आहे की शिक्षणक्षेत्रातून राज्यसरकारने ताबडतोब माघार घेण्याचा प्रश्न उद्‌भवत नाही. या अहवालानुसार " शिक्षणातून राज्यसरकारने अंग काढून घ्यायचे झाले, तर संकुचित पद्धतीहून अधिक चांगल्या व उच्च पद्धतीपुढेच ती माघार घेतली जावी."

विशेषत: उच्च शिक्षणाचा बळी देऊन प्राथमिक शिक्षणाचा विस्तार करण्याला, रानडे, मेहता, वाच्छा इत्यादि लोकांप्रमाणे भांडारकरांचाहि पाठिंबा नव्हता. उच्च शिक्षण मिशनऱ्यांकडे सोपवून, राज्याने शिक्षणक्षेत्रातून अंग काढून घेण्याला त्यांनी सक्त विरोध केला. त्यांचे असे मत होते की ही जबाबदारी आपल्या खांद्यावर घेण्याच्या परिस्थितीत भारतीय लोक अजून नाहीत. उच्च शिक्षण सरकारच्या प्रत्यक्ष अमलाखाली राहिले पाहिजे.

स्त्री-शिक्षणाला उत्तेजन मिळण्यासाठी व त्याची वाढ होण्यासाठी हरेक प्रयत्न करण्याची भांडारकरांना तळमळ होती. ' स्टुडंट्स लिटररी अँड सायंटिफिक सोसायटी ' चे (वाङमयीन व शास्त्रीय विद्यार्थी मंडळ) चे चिटणीस असताना ( १८६५–७० ) मंडळाच्या मुलींच्या शाळेच्या व्यवस्थापन कार्याशी ते संबंधित होते. त्यांचे उदाहरण पुढे ठेवून १८७० मध्ये प्रार्थना समाजाने मागास जातींसाठी संध्याकाळची शाळा सुरू केली. पुण्यात असतानासुद्धा या निकडीच्या प्रश्नाकडे त्यांनी दुर्लक्ष केले नाही. त्यांचे मित्र रावबहादूर शंकर पांडुरंग पंडित व न्यायमूर्ती रानडे यांच्याप्रमाणेच भांडारकरांचाहि पुण्याच्या ' फीमेल हायस्कूल 'च्या स्थापनेशी संबंध होता. ही संस्था महाराष्ट्रात स्त्री-शिक्षणासाठी मोठे कार्य करीत आली आहे.

शैक्षणिक संस्थांमधून धार्मिक व नैतिक शिक्षण देण्यावर भांडारकर भर देत. शिक्षणाच्या या बाजूसंबंधीचे आपले विचार त्यांनी १९१४ च्या मनोरंजनाच्या एका अंकात व्यक्त केले आहेत. शिक्षणसंस्थांमधून विद्यार्थ्यांना धार्मिक व नैतिक शिक्षण दिले जावे याबद्दल त्यांचा आग्रह होता. शिक्षणसमितीने **महाविद्यालयासाठी** व शालांसाठी नीतिबोध देणारी

पाठ्यपुस्तके तयार करण्याची शिफारस केली व तिला भांडारकरांनी मान्यता दिली. महाविद्यालयीन शिक्षणाबद्दलच्या भांडारकरांच्या कल्पना त्यांच्या ' दि एम्स् अँड एंड्स् ऑफ कॉलेज एंज्युकेशन ' (महाविद्यालयीन शिक्षणाची ध्येये व उद्दिष्टे) या व्याख्यानातून उत्तम प्रकारे व्यक्त झाल्या आहेत.

विद्यापीठ सोडल्यानंतर वेगवेगळ्या धंद्यांत पडणाऱ्या पदवीधरांना महाविद्यालयात शिकविल्या गेलेल्या विषयांचा पूर्ण विसर पडतो हे पाहून ते अस्वस्थ होत. त्यांनी वर्षासने देण्याच्या आवश्यकतेवर भर दिला. ही वर्षासने फेलोशिप्स किंवा प्राध्यापकपदांच्या स्वरूपात देण्यात यावीत व त्याचा फायदा भारतीय लोकांना मिळावा यावर त्यांचा भर होता. त्यांनी जर्मनीचे उदाहरण दिले. तेथील विद्यापीठ आपल्या छात्रांना उच्च संशोधन चालू ठेवण्यासाठी अशा प्रकारच्या सोयी उपलब्ध करून देत असे. सरकारजवळ असलेल्या दक्षिणा निधीचा उपयोग या कामासाठी व्हावा असेहि त्यांनी सुचविले. शिक्षणसंचालक ई. आय. हॉवर्ड हेहि प्राध्यापकांच्या अशा जागा व शिष्यवृत्त्या काढण्यास अनुकूल होते. भारतीय लोकांमध्ये अभ्यासाच्या प्रयत्नांना उत्तेजन मिळावे म्हणून दक्षिणा निधीतून त्यांनी फेलोशिप्स काढल्या. पण पुढे मूळ कल्पना बाजूलाच पडली व अल्प मुदतीच्या शिष्यवृत्त्यांत या फेलोशिप्सचे रूपांतर झाले. या बदलाला भांडारकर काही फारसे अनुकूल नव्हते. त्यांनी असे सुचविले की विद्यापीठाच्या फेलोशिप्स किंवा शिष्यावृत्त्या म्हणून द. म. १५० ते २५० रुपये वेतन ठेवून दक्षिणा निधीचा उपयोग पुन्हा करता येईल. त्यांना अशी आशा होती की यामुळे निदान काही थोड्या लोकांना तरी आपले आयुष्य अभ्यास व संशोधनासाठी वेचणे शक्य होईल. त्यांनी मुंबईतील व्यापारी–वर्गालाहि निधीसाठी आवाहन केले. त्यांनी सुचविले की दक्षिणा निधी योजनेत येणाऱ्या ज्येष्ठ फेलोंनी वर्षाकाठीं निदान दहा व्याख्याने द्यावीत आणि त्यांनी व कनिष्ठ फेलोंनी सरकारी महाविद्यालयांतील अधिव्याख्यात्यांना मदत करावी. पदवीदान समारंभाच्या आपल्या

व्याख्यानात आणि १९०४ साली लॉर्ड कर्झनचे विद्यापीठ विधेयक मांडले गेले त्या वेळच्या विधानसभेतील भाषणात, भांडारकरांनी अशा प्रकारची मते मांडली. त्यांच्या सूचनांचा स्वीकार होऊन त्या अंमलबजावणीसाठी सरकारकडे पाठविण्यात आल्या. न्यायमूर्ती तेलंगांनी तर गव्हर्नर लॉर्ड रिपन यांना आर्थिक मदतीसाठी विनंती केली.

लॉर्ड कर्झनने नेमलेल्या विद्यापीठ–मंडळाचे एक सभासद म्हणून भांडारकरांनी या विधेयकावरील चर्चेत भाग घेतला व त्याला अनुकूल मत दिले. शिक्षणपद्धतीतील सुधारणेसंबंधी त्यांचे ठाम मत होते की इंग्लंडने आपले सर्वोत्तम विद्वान भारतात पाठविले पाहिजेत. भारतातील विद्यापीठांत इंग्रजी अध्यापनाचे सर्वोत्तम प्रतिनिधी मिळाले नाहीत तर ती अयशस्वी ठरतील आणि ही गोष्ट या देशाच्या सांस्कृतिक व शैक्षणिक प्रगतीला विघातक आहे. आदर्श अध्यापक कसा असावा हे दर्शविण्यासाठी त्यांनी आपले पूजनीय अध्यापक हॉवर्ड व सर अलेक्झांडर ग्रँट यांच्या नावांचा उल्लेख केला.

लॉर्ड कर्झनच्या भारतीय–विद्यापीठ कायद्याचे उद्दिष्ट विद्यापीठीय पद्धतीची मुळापासून पुनर्रचना करण्याचे नव्हते. विद्यापीठांच्या व्यवहारात सरकारला हस्तक्षेप करण्यास या कायद्याने पुरेसा वाव मिळाला आणि बहुसंख्य भारतीय लोकांत असंतोष निर्माण झाला. या कायद्यामुळे त्यांच्यांत संशयाची लाट उसळली. भांडारकरांचा या विधेयकाला पाठिंबा असणे हे गोपाळ कृष्ण गोखल्यांसारखे उदारमतवादी किंवा बाळ गंगाधर टिळकांसारखे जहाल यांपैकी कोणालाहि अजिबात आवडले नाही. हे विधेयक प्रत्यक्षात भारतीय विद्यापीठांचे स्वातंत्र्य नियंत्रित करीत आहे हे भांडारकरांच्या लक्षात आले नाही हे कबूल केले पाहिजे. ब्रिटिशांचे भारतावरील वर्चस्व हा ईश्वरी इच्छेचा प्रभाव आहे व ईश्वरी इच्छेचे पालन माणसाने नेहमी केलेच पाहिजे असे, पौर्वात्य संस्कृतीत तयार झालेल्या त्यांच्या मनाने कदाचित घेतले असेल. याविरुद्ध बंडाचा आवाज उठविणे योग्य ठरेल, असे त्यांच्या समकालीनांप्रमाणे त्यांना वाटले नाही.

डेक्कन एज्युकेशन सोसायटीने पुण्यात स्थापन केलेल्या 'न्यू इंग्लीश स्कूल'बद्दल सुरवातीला भांडारकरांचे मत अनुकूल नव्हते. पण पुढे राजवाडे, आपटे, गोखले यांच्यासारखे नामवंत विद्वान जेव्हा या शाळेला येऊन मिळाले तेव्हां भांडारकरांचे मत पालटले आणि ते संस्थेच्या प्रमुख आश्रयदात्यांपैकी एक झाले.

भांडारकरांच्या शिक्षणविषयक कल्पना मुख्यतः त्यांच्या दोन व्याख्याना-तून अजमावता येतील. पुण्याच्या डेक्कन महाविद्यालयाच्या पंचविसाव्या वर्धापनदिनाच्या निमित्ताने त्यांनी दिलेले 'द एम्स ॲंड एन्ड्स् ऑफ कॉलेज एज्युकेशन', (महाविद्यालयीन शिक्षणाची ध्येये व उद्दिष्टे') एक व्याख्यान[१], आणि दुसरे, मुंबई विद्यापीठाचे उपकुलगुरू म्हणून पदवी-दानाच्या वेळी दिलेले व्याख्यान.[२]

पहिल्या व्याख्यानात त्यांनी "एज्युकेशन" (शिक्षण) या शब्दाची "...प्रत नेणे" अशी व्युत्पत्तीहि दिली आहे. म्हणजेच, "अचूक दृष्टिकोण तयार होण्यासाठी मार्गदर्शन करणे." 'विनय' या संस्कृत शब्दाचाहि हाच अर्थ आहे. भावना व संज्ञांना वळण लावण्याची प्रक्रिया आणि सुव्यवस्थित वा शिस्तबद्ध मन, सभ्य वागणूक व नम्रता हे तिचे परि-णामहि या शब्दातून सूचित होतात. याच गोष्टी अधिक स्पष्ट करणारा आणखी एक संस्कृत शब्द म्हणजे 'संस्कार'. याचा अर्थ मनाला वळण लावणे किंवा त्याला घाट वा आकार देणे. अचूक निरीक्षण करून तुलना-त्मक व चिकित्सक वृत्तीने योग्य गृहीतकृत्य वा संकल्पनापर्यंत येऊन पोहोचायला शिकविणे हे शिक्षणाचे आणखी एक उद्दिष्ट. अशा तऱ्हेने मनाला व्यापक बनविण्यास व त्याचा संकुचितपणा नाहीसा करण्यास शिक्षण कारणीभूत होते. भांडारकरांच्या मते अशा शिक्षणाचे अंतिम साध्य म्हणजे, सद्सद्विवेकबुद्धीने किंवा नैतिक निर्णयाने निश्चित

---

१. 'कलेक्टेड वर्क्स्', खंड १ पृ. ४६१ आाण पुढ.

२. 'कलेक्टेड वर्क्स्', खंड १ पृष्ठे. ४२७ – ४५२.

होणाऱ्या सापेक्ष स्वरूपात आपल्या सर्व क्रिया - प्रेरणा होण्यासाठी लागणारी शिस्त व वळण.

या उद्दिष्टाच्या पूर्तीसाठी महाविद्यालयांत अनेक साघने उपयोगात आणली जातात. वेगवेगळे अभ्यासक्रम विद्यार्थ्यांच्या भावनांना व आकांक्षांना वळण देण्याच्या दृष्टीने योजलेले असतात. परंतु विद्यार्थ्यांना खरी प्रेरणा मिळते ती त्यांच्या उत्कृष्ट प्राध्यापकांच्या चालत्या बोलत्या आदर्शातून आपल्या उच्च नीतिमत्तेने व बहुश्रुत विद्वत्तेने भांडारकरांनी असे उदाहरण घालून दिले.

समाजसुधारक म्हणून बालविवाह, जातिसंस्था यांसारख्या दोषांकडे भांडारकरांनी योग्य प्रकारे लक्ष घातले. आपली वागणूक व चालिरीती चिकित्सकपणे पारखून घ्याव्यात व दोष नाहीसे करण्याचा प्रयत्न करावा असे आवाहन त्यांनी सुशिक्षित भारतीयांना केले. " केवळ स्वतःच्या जाणिवेच्या बळावर आपल्या सबंघ संस्कृतीचा विकास करून घेणारी एखादी मानवजात असू शकेल " ही गैरकल्पना सोडून देण्यास या लोकांना भांडारकरांनी सांगितले. त्यांनी उद्धृत केलेला जागतिक इतिहासाचा पुरावा नेमके उलट सिद्ध करतो. ऐतिहासिक उदाहरणांवरून असे दिसून येते की, ग्रीकांनी काही गोष्टी फेनिशियनांकडून व इजिप्शियनांकडून उचलल्या. रोमनांनी ग्रीकांकडून व युरोपीय संस्कृतीने ग्रीक, रोमन, जर्मन व ज्यू यांच्याकडून त्याचप्रमाणे भारतीय संस्कृतीने द्रविड, ग्रीक व त्यांच्यानंतर अरबांकडून पुष्कळ काही घेतले आहे.

या नव्या शिक्षणाचे काही चांगले परिणाम मान्य करतानाच सुशिक्षित लोकांमध्ये मनाचे स्वातंत्र्य, कर्तव्यदक्षता, सचोटी व सत्याची चाड हे गुण निर्माण करण्यात हे शिक्षण पुरेसे परिणामकारक ठरलेले नाही हेंहि भांडारकरांनी कबूल केले. अचूक विचार करण्याची शक्ति आपल्यात आलेली असली तरी चिकित्सक व तौलनिक वृत्तीची आपल्यात अजून उणीव आहे, याची त्यांना खंत होती. या असमाधानकारक घडामोडींची कारणे तर त्यांनी दाखविलीच पण त्यावरचे उपायहि सुचविले.

जुन्या काळच्या एका विद्वान व अधिकारी व्यक्तीचे त्यांनी उदाहरण दिले. त्याचे म्हणणे होते, की आपण घेत असलेल्या शिक्षणात जर काही ' वीर्य ' किंवा सामर्थ्य हवे असेल आणि ते जर फलदायी व्हायला हवे असेल तर आपल्यातील काही उणीवांची जाणीव करून घ्यायचा आपण प्रयत्न केला पाहिजे. ज्ञानप्राप्तीच्या प्रयत्नांत आपण प्रामाणिक असायला हवे आणि आपल्याला त्याची खरीखुरी आवड हवी. त्यापासून मिळणाऱ्या तात्कालिक कायद्यांची आपण पर्वा करू नये. जे सत्य, शिव आणि सुंदर असेल ते आत्मसात करण्यासाठी आपल्या मनाची कवाडे नेहमी खुली हवीत. ते कुठून येते यांची चिंता करण्याचे आपल्याला कारण नाही. स्वतःजवळ जे ज्ञान नाही ते विद्यार्थ्यांना देण्याचा खटाटोप करू नये. या देशाच्या अतिप्राचीन परंपरांना अनुसरून आपण मातापिता व गुरूजनांचा आदर करावा. अध्ययनावरची आपली निष्ठा अढळ असावी आणि कोणत्याहि कारणाने त्यापासून आपले मन विचलित होता कामा नये. भांडारकर शेवटी म्हणतात, "‘ असे झाले तरच आपल्याला दिलेल्या शिक्षणाने आपल्या मानसिक प्रवृत्तींचा विकास होईल. आपल्या हृदयातील भावनांमध्ये एक नैतिक सुसंगती प्रस्थापित होईल व आपल्या व्यक्तिमत्त्वाचे उन्नयन होईल...असे झाले तरच आपण आपल्या मागासलेल्या देशाची उन्नति करू शकू आणि इतर देशांमध्ये त्याला त्याचे स्थान मिळवून देऊ शकू."

मुंबई विद्यापीठाचे उपकुलगुरू म्हणून नव्या पदवीधरांना उद्देशून भांडारकरांनी केलेले १८९४च्या पदवीदान समारंभाच्या वेळचे व्याख्यान असेच उद्बोधक आहे. विद्यापीठाचे न्यायमूर्ती तेलंग, वासुदेव विश्वनाथ गोखले आणि एल्. आर्. वैद्य यांसारख्या तेजस्वी विद्वानांच्या अकाली निधनामुळे त्यांना धक्का बसला होता. यांच्या स्मृतीला, विशेषतः त्यांच्यापूर्वी अधिकारावर असलेल्या न्यायमूर्ती काशिनाथ त्रिंबक तेलंगांना भावपूर्ण श्रद्धांजली अर्पण करून हा अकाली मृत्यूचाच प्रश्न त्यांनी चर्चेला घेतला. दारिद्र्य, अवघड अभ्यासक्रम व विद्यापीठाचे कडक नियम यांचा या अकाली मृत्यूशी काहीतरी संबंध आहे अशी समजूत होती. या दृष्टिकोनाबद्दलचा

मतविरोध व्यक्त करतानाच विद्यापीठाशी संबंध नसलेल्यांची टक्केवारी विचारात घेण्याच्या आवश्यकतेवर भांडारकरांनी भर दिला. अनेक पदवीधरांचा मृत्यू काही त्यांनी अभ्यासक्रम संपविल्यावर लगेच झाला नव्हता या गोष्टीकडे त्यांनी लक्ष वेधले. तेव्हा त्यांनी निवडलेल्या पेशा-चाहि काहीतरी संबंध त्यांच्या अकाली मृत्यूशी असला पाहिजे. प्रदीर्घ अभ्यासक्रमांचा तरुण वर्गावर निश्चितच फार ताण पडतो हे मान्य करता-नाच अशा घटनांना इतर घटकहि तितकेच जबाबदार असतात याची त्यांना जाणीव होती. उदाहरणार्थ विद्यार्थ्यांना, मिळणारे अन्न फारसे सकस नसे, त्यांना शारीरिक व्यायामाची आवड नसे, जीवनाचा आनंद कसा लुटावा हे त्यांना माहीत नव्हते. पुष्कळजण फार लौकर विवाह करीत आणि अल्पवयात मातृत्व प्राप्त झाल्यामुळे साहजिकच त्यांच्या बायकांची प्रकृती ढासळत असे. नव्या जीवनपरिस्थितीला योग्य ठरण्यासाठी प्रथम सामाजिक बाबतीतील आपल्या कल्पना बदलणे आवश्यक आहे असे भांडार-करांनी निक्षून सांगितले आणि वक्तशीरपणा व नियमितपणा हे इंग्रजी लोकांचे गुण शिकण्याचा त्यांनी त्या तरुण पदवीधरांना उपदेश केला. सुर-वातीपासूनच ते शिक्षणाचेविशेष पुरस्कर्ते असल्यामुळे त्यांना वाटले की जीव-नात प्रवेश करताना याचा विद्यार्थ्यांना फायदा होईल; मार्गदर्शनासाठी त्यांना व्यवहार्य तत्त्वे त्यातून मिळतील. अध्यापक व परिक्षक या दोघांवरहि हे अवलंबून होते. विद्यार्थ्यांना विचार करायला आणि त्याच्या कार्य कार-णांचा मागोवा घ्यायला शिकविण्याचे काम अध्यापकाचे आहे; आणि त्यांना हे शिकविले गेले आहे की नाही हे पाहण्याचे कर्तव्य परीक्षकाचे आहे. योग्य अध्यापक व परिक्षक यांच्या नेमणुकीचा प्रश्न या ठिकाणी सातत्याने येतो. दुर्दैवाने या दोन्ही बाबतींत परिस्थिती समाधानकारक नव्हती हे भांडारकरांनी कबूल केले.

अभ्यासक्रम पुरा करणे येवढेच माणसाला सुशिक्षित होण्यास पुरेसे नसते. संस्कृतमध्ये सुशिक्षित माणसाला ' शिष्ट ' अशी संज्ञा आहे. पतञ्जलीने या शब्दाची व्याख्या अशी केली आहे–" जो मनुष्य द्रव्यसंचय करीत नाही,

जो लोभी नाही व जो निरीच्छपणे, आणखी कसलीहि अपेक्षा न ठेवता विद्येच्या एखाद्या शाखेत प्रावीण्य मिळवितो (तो शिष्ट)." माणसाने विद्याव्यासंगासाठी स्वतःला वाहून घेतले पाहिजे आणि ऐहिक उत्कर्षाला तुच्छ मानले पाहिजे अशी या मागची कल्पना. हे जो करतो तोच खऱ्या अर्थाने सुशिक्षित व सुसंस्कृत मनुष्य होय. पदवीपूर्व वर्गातील विद्यार्थ्यांना भांडारकरांनी उपदेश केला की केवळ पदव्या मिळविण्याच्या दृष्टीने आपल्या विषयांचा अभ्यास करू नका, तर तुमच्यातील जे चांगले आहे तेच अधिक चांगले करण्यासाठी, ते जाणून घेण्याच्या नम्र व प्रामाणिक ओढीने अभ्यास करा व त्याला आपल्या स्वभावाचा एक भाग बनवा. तरुण पदवीधरांना त्यांनी कळकळीने उपदेश केला की त्यांनी निवडलेल्या विषयाबद्दल आयुष्यभर आस्था बाळगली पाहिजे. इतर देशांमध्ये या कल्पनांचा होत असलेला प्रसार जवळून पाहत राहिले पाहिजे. त्यांचा त्यांना निश्चित फायदा होईल.

भांडारकरांच्या मनावर जिचा सतत पगडा होता अशी प्रभावी कल्पना म्हणजे मानवजातीची एकात्मता. या कल्पनेचा युरोपीयांवरहि जबरदस्त प्रभाव पडला होता. या कल्पनेनेच आपले आणि इतरहि देशांचे वाङ्मय, इतिहास, धर्म यांचा सहानुभूतीने अभ्यास करण्यास त्यांना प्रवृत्त केले होते. रानटीपणाकडून सुसंस्कृतपणाकडे वाटचाल केलेल्या इतर लोकांच्या कल्पनेत क्रमशः होत गेलेल्या विकासाचा काळजीपूर्वक अभ्यास केला पाहिजे असे भांडारकरांनी आपल्या देशवासियांना सांगितले. मानववंशाचा साकळलेपणा, ऱ्हास व अधोगतीच्या कारणांचा अभ्यास करून सुसंस्कृतपणाकडे होणाऱ्या त्याच्या वाटचालीचा माग काढताना त्याच्या इतिहासाकडे पूर्वग्रहविरहित मनाने पाहण्याची स्फूर्ति आपल्याला या उदात्त विचारांनी दिली पाहिजे. भांडारकरांनी केलेल्या या पदवीदान प्रसंगीच्या व्याख्यानाच्या समारोपात लक्षणीय स्पष्टता व दूरदृष्टी दिसून येते ती अशी—

" माझ्या मित्रांनो, भारताच्या इतिहासातील एका महत्त्वपूर्ण काळात

आपण वावरतो आहोत, या काळातील आपल्या वर्तणुकीवर आपल्या देशाचे भवितव्य अवलंबून आहे...युरोपीय संस्कृतीमुळे या देशाची बौद्धिक व नैतिक जाणीव आता जागृत व्हायला हवी. त्याने संस्कारित झालेल्या आपल्यावर या देशाच्या पुनरुज्जीवनाचे कार्य व त्याची अवघड जबाबदारी आहे. मानवतेशी संबंधित असलेल्या प्रत्येक गोष्टीच्या विचाराला उत्तेजन मिळाले पाहिजे. वाङ्मय व तत्त्वज्ञान यांना नवी चालना मिळत आहे. आपल्या देशी भाषांची प्रगति झाली पाहिजे व ज्ञानलालसा वाढली पाहिजे. आपल्या सामाजिक संस्था व चालीरीतींतील प्रचंड अन्याय व ढोंगीपणा यांत सुधारणा झाली पाहिज. व्यावहारिक नीतिमत्तेचा दर्जा उंचावला पाहिजे, अभिरुची सुधारली पाहिजे, लोकांसमोर उच्च कल्पना ठेवल्या गेल्या पाहिजेत, आणि धर्म सुधारून अधिक शुद्ध करून घेतला पाहिजे...या पुनरुज्जीवनाच्या प्रक्रियेत, कर्तव्याची जाणीव, सत्यप्रियता व न्यायप्रियता या कल्पना किंवा तत्त्वेच केवळ आपल्याला सुरक्षितपणे मार्गदर्शन करू शकतील. ही तत्त्वे आपण ग्रहण करू शकलो नाही तर आपण घेत असलेले शिक्षण वरवरचे ठरले असे म्हणावे लागेल. ही तत्त्वे व्यक्तिमत्त्वाचे उन्नयन तर करतीलच शिवाय मानवजातीच्या भावी सुखाची हमी केवळ हीच तत्त्वे घेतील. कारण समाजव्यवस्था, चालीरीती व रूढी जेव्हा सत्य व न्याय यावर आधारलेल्या असतात तेव्हाच त्या देशाच्या सुखाला व उत्कर्षाला साधक ठरतात."[१]

१. 'कलेक्टेड वर्क्स्', खंड १, पृष्ठ ४५०—५१.

# ५. थोर प्राच्यविद्यातज्ञ

'प्राचीन भारतीय विद्यांच्या सर्व शाखांवर विधायक व सूचक टीका करण्यात तज्ञ[1]' असलेले रामकृष्ण गोपाळ भांडारकर एका विचारप्रणालीचे जनक होते. प्राच्यविद्यातज्ञांत ती 'भांडारकर प्रणाली' म्हणून प्रसिद्ध आहे. भांडारकरांनी दाखवून दिलेल्या दिशा पुढे प्राचीन भारतीय विद्याभ्यासाच्या विविध शाखांच्या अनेक अभ्यासकांनी विकसित केल्या. एच्. सी. रे, हेमचंद्र राय चौधरी, के. ए. निळकंठशास्त्री, पांडुरंग वामन काणे, श्रीपाद कृष्ण बेलवलकर, पांडुरंग दामोदर गुणे इत्यादी प्राध्यापकांचे मौलिक कार्य म्हणजे वस्तुतः या विचारप्रणालीचे फल होय. या थोर प्राचीन भारतीय विद्यातज्ञांचे विविध प्रकारचे संशोधन समजून घ्यायचे असेल तर प्रथम त्याची ऐतिहासिक पार्श्वभूमि नीट समजली पाहिजे.

एकोणिसावे शतक हा अद्भुत असा सृजनात्मक काळ; यातच भांडारकरांच्या आयुष्यातील सुवर्णवर्षे गोवलेली आहेत. भारताचा सांस्कृतिक वारसा पुन्हा शोधून काढण्याची आणि त्याच्या वैभवशाली भूतकाळाच्या खऱ्या प्राणतत्त्वाचा नवा अर्थ लावण्याची ओढ हे या शतकात झालेल्या भव्य पुनरुज्जीवनाचे विशेष होत. पाश्चात्य शास्त्रशुद्ध विचारसरणीचा भारतीय समाजावर विशेषतः राजकीय व सांस्कृतिक अशा सर्व पातळ्यांवर, सखोल प्रभाव पडला. हे पुनरुज्जीवन हा त्याचाच परिणाम होय.

आपल्या भूतकालीन परंपरेपासून कोणत्याहि देशाला फटकून राहता येत नाही. न्यायमूर्ती महादेव गोविंद रानड्यांचे एक निरीक्षण फार महत्त्वपूर्ण आहे. "खऱ्या सुधारकाला कोऱ्या पाटीवर लिहायचे नसते. अपूर्ण वाक्य पूर्ण करण्याचेच काम बहुदा तो करीत असतो. भूतकाळ तोडून काढायचा म्हटल्याने तोडता येत नाही आणि तोडता आला तरी तसे

---

१. डॉ. देवदत्त रामकृष्ण भांडारकर 'लेक्चर्स ऑन एनशंट इंडियन न्युमिस्मॅटिक्स्', अर्पणपत्रिका.

करता कामा नये." भारताचे हे पुनरुत्थान म्हणजे खरोखर १९ व्या शतकातील पाश्चात्य विचार व भारताच्या प्राचीन वैभवशाली दिवसातल्या अभिजात विद्यांचे पुनरुज्जीवन यांच्या संगमातून झालेली निर्मिती होती.

या विचारातून उदयास आलेल्या संस्थांमध्ये कलकत्त्याची 'एशियाटिक सोसायटी' ही एक. भारताच्या सांस्कृतिक पुनरुज्जीवनात या संस्थेचा फार मोठा वाटा होता. हिची स्थापना १७८४ च्या जानेवारीत, सर विल्यम जोन्स या अभिज्ञ विद्वानाने, 'भारताचा इतिहास, प्राचीनत्व, कला, शास्त्र व साहित्य' यांचा शोध करण्याच्या हेतूने केली. या संस्थेशी संबंधित असलेल्यात हेन्री थॉमस, कोलब्रुक व जेम्स प्रिन्सेप हे विद्वानहि होते. अशाप्रकारे भारताचा भूतकाळ उलगडणारे पहिलेवहिले कार्यकर्ते म्हणजे युरोपीय विद्वानांची व अधिकाऱ्यांची ही तुकडी. इंग्लंड, जर्मनी, फ्रान्स व हॉलंड अशा विभिन्न देशांतून ही मंडळी आली होती. वर उल्लेख केलेल्या इंग्रजांशिवाय, विल्सन, कनिंगहॅम, फर्ग्युसन, मॅकडोनल, कीथ, एफ्. डब्ल्यू. थॉमस, ई. जे. थॉमस आणि इतरहि थोर नावे घेता येतील. परंतु या क्षेत्रात सर्वात भरघोस कामगिरी केली ती श्लेगेल, बॉप, रोथ, ओल्डनबर्ज, गोल्डनर, जेकोबी, मॅक्समुल्लर, वेबर, गोल्डस्टकर विटरनित्झ आणि इतर जर्मन विद्वानांनी फ्रेंच व डच विद्वानात सिलव्हेन, लिअर, सेना, बुर्न्यू, रेनो, व्हॉलने, कार्पेन्तिअर, कॉसिनी, युजीन, हॅमेकर, व कर्न हे प्रमुख होत. आपला उदात्त भूतकाळ प्रकाशात आणण्यासाठी आणि भारताचा चिरंतन संदेश सर्व जगात पसरविण्यासाठी भारतीयांनीहि लौकरच आपल्या वारशाचा शास्त्रशुद्ध अभ्यास करण्यास सुरुवात केली. राजा राममोहन रॉय, राजा राधाकान्त देव, ईश्वरचंद्र विद्यासागर आणि पुढे राजेंद्रलाल मित्र ही आघाडीच्या भारतीय विद्वानांपैकी काही नावे होत. प्राचीन भारतीय विद्यांबद्दलच्या भारतातील या जागरूकतेचे प्राध्यापक मॅक्स मुल्लरने मोठ्या बोलक्या शब्दांत वर्णन केले आहे ते असे—

"भारताच्या सध्याच्या बौद्धिक जीवनात अनेक वेधक प्रश्न आहेत.

त्यांची केवळ काळोखी बाजूच पाहणे आणि सध्या भारतात दिसत असलेले बौद्धिक पुनरुज्जीवन हे प्रक्षोभ व अपयश याशिवाय अशक्य आहे हे विसरणे हा परिपाठ फार रूढ होतो आहे. भारतात एका नव्या मानववंशाचा उदय होतो आहे. त्याने जणू मधली हजार वर्षे ओलांडून पुढे पाऊल टाकले आहे. आणि अचानक युरोपच्या बौद्धिक क्षितिजावर त्याचे आगमन झाले आहे. आपल्याला सर्वात महत्त्वाची वाटणारी जी त्यांची विद्वत्ता तिच्याबाबतीत हे खरे की संस्कृत विद्वानांची एक जुनी प्रणाली नष्ट होत आहे. आणि तिच्याबरोबर पुष्कळ काही असे नाहीसे होईल की जे आपल्याला कधीच भरून काढता येणार नाही. परंतु युरोपीय प्राध्यापकांकडून शिक्षण मिळालेली एक नव्या व अतिशय होतकरू अशा संस्कृत अभ्यासकांची पिढी उदयास येत आहे. आणि ते आमच्या विद्वानांपुढे अधिक भक्कम प्रतिस्पर्धी म्हणून उभे राहतील. किंबहुना आजच्या वादविवादावरून तर वाटते की ते तसे आताच उभे राहिले आहेत. भारताच्या पुराणवस्तुसंशोधनाबद्दलच्या व वाङ्मयाबद्दलच्या काही वादग्रस्त मुद्यांवरचे...डॉ. भाऊ दाजींचे निबंध फार मोलाचे आहेत. अथक परिश्रम करणारे राजेंद्रलाल मित्र कलकत्त्याच्या एशियाटिक सोसायटीच्या प्रकाशनात फार चांगली कामगिरी बजावीत आहेत... प्रा. भांडारकर, शंकर पांडुरंग पंडित व त्यांच्या सहकाऱ्यांनी मुंबईत प्रकाशित केलेल्या संस्कृत पाठ्यपुस्तकांच्या आवृत्त्या युरोपीय विद्वानांच्या उत्तमोत्तम पुस्तकांच्या बरोबरीने सहज बसू शकतील.[१]"

या नव्या युगाचा जबरदस्त परिणाम पश्चिम हिन्दुस्थानावरहि झाला. २६ नोव्हेंबर १८०४ रोजी सर जेम्स मॅकिन्टॉश यांच्या मार्गदर्शनाखाली 'बॉम्बे लिटररी सोसायटी 'ची सुरुवात झाली. १८२९ मध्ये या संस्थेचे रूपांतर ' रॉयल एशियाटिक सोसायटी 'च्या मुंबई शाखेत झाले व काही

---

१. ' जनरल ऑफ दि बॉम्बे ब्रँच ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी, १८७९, ४१–४२.

निवडक अशा नामांकित युरोपीय विद्वानांच्या मार्गदर्शनाखाली तिची भरभराट होत गेली. परंतु या संस्थेच्या इतिहासातील त्या काळात सर्वांत आघाडीवर होते डॉ. जॉन विल्सन. हा थोर संस्कृतज्ञ १८३५ मध्ये संस्थेचा अध्यक्ष झाला. १० जुलै १८३९ रोजी झालेल्या आपल्या व्याख्यानात डॉ. विल्सन यांनी संस्थेची उद्दिष्टे विशद करीत असताना भारतीय जीवनाच्या ऐहिक, ऐतिहासिक, वाङ्मयीन, धार्मिक व शासकीय या विविध अंगांचा शोध संस्थेच्या सभासदांनी घ्यावा असे त्यांना सांगितले.

**भांडारकरांपूर्वीचा प्राचीन भारतीय विद्याभ्यास**

'रॉयल एशियाटिक सोसायटी'च्या मुंबई शाखेच्या स्थापनेमुळे पश्चिम हिंदुस्थानातील प्राचीन भारतीय विद्यांच्या अभ्यासाच्या प्रगतीला प्रेरणा मिळाली. पेशव्यांच्या ऱ्हासानंतर पुण्याने अजून डोके वर काढले नव्हते. जीवनाची सर्व बाजूंनी विनाश व अवनति होत असताना मुंबई इलाख्याने पुढाकार घेतला आणि जोम व वाढीच्या खुणा दिसू लागल्या. मोरशास्त्री साठे, कृष्णशास्त्री चिपळूणकर व रावबहादूर गोपाळ हरी देशमुख यांसारखी मोजकी नावे सोडली तर पुण्यात उल्लेखनीय असे काही नव्हते. पुण्याच्या या शोचनीय स्थितीचे वर्णन न्या. रानडे यांनी आपल्या निबंधांत केले आहे. विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या पुण्यतिथिनिमित्त केलेल्या भाषणात टिळकांनीहि या गोष्टीचा उल्लेख केला आहे.

पौर्वात्य विद्या-संशोधनाच्या क्षेत्रात भांडारकरांचे पदार्पण होण्यापूर्वी ज्या थोड्या व्यक्ती या क्षेत्रात होत्या, त्यांनी भांडारकरांच्या महान् कार्याचा मार्ग सुकर करून ठेवला होता. या सुमारास काही भारतीयांनाहि 'रॉयल एशियाटिक सोसायटी'चे सभासद करून घेतले गेले. १८४० पासून असलेले पहिले सदस्य म्हणजे श्री. मनिकजी कुरसेतजी हे एक पारशी गृहस्थ होत. सुरवातीच्या सभासदांमध्ये प्रा. बाळशास्त्री जांभेकर व डॉ. भाऊ दाजी यांच्यासारखे विख्यात प्राचीन भारतीय विद्यातज्ञ व पुराणवस्तुतज्ञ होते. प्रा. जांभेकर हा विविध गोष्टींची व्युत्पन्न अभिरुची असलेला मनुष्य होता. बंगालमध्ये राममोहन रॉय यांनी जी कामगिरी

बजावली तशाच स्वरूपाची कामगिरी महाराष्ट्रात जांभेकरांनी बजावली. भारताचा प्राचीन इतिहास सांगणारे शिलालेख व ताम्रपट यांवरचे अनेक संशोधनपर लेख त्यांनी ' रॉयल एशियाटिक ' व ' जिऑग्राफिकल सोसायटी 'पुढे वाचले. शिलालेख, ताम्रपट, कालनिर्णय व भारताच्या प्राचीन इतिहासाबद्दलच्या अशाच इतरहि प्रश्नांवरील बहुविध संशोधनामुळे डॉ. भाऊ दाजी यांना नावलौकिक मिळाला. आणखी एक उल्लेखनीय विद्वान म्हणजे रावबहाद्दर शंकर पांडुरंग पंडित. ' ऋग्वेदा 'ची त्यांची इंग्रजी व मराठी भाषांतरे आणि ' अथर्ववेद भाष्य ' व ' गौडवहो ' यांच्या संशोधित आवृत्त्यांमुळे ते प्रसिद्ध आहेत. १८७४ साली लंडनमध्ये ' प्राच्यविद्यातज्ञांच्या आंतरराष्ट्रीय परिषदेत ' (इंटरनॅशनल कॉंग्रेस ऑफ ओरिएंटॅलिस्ट्स्) मुंबई सरकारचे नियोजित प्रतिनिधी म्हणून, त्यांनी, कालिदासाच्या कालनिर्णयावर एक महत्त्वपूर्ण संशोधनपर लेख वाचला. रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलिक या विद्वानाचा आदर्श भांडारकरांसमोर सदैव होताच. ' हिंदुधर्मशास्त्र ' आणि ' व्यवहारमयूख ', ' याज्ञवल्क्यस्मृति ' व ' मनुस्मृति ' यांच्या चिकित्सक आवृत्त्या प्रसिद्ध करून मंडलिक यांनी प्राचीन भारतीय शास्त्रांच्या अभ्यासाला हातभार लावला. मुंबईच्या ' रॉयल एशियाटिक सोसायटी 'चे ते उपाध्यक्ष होते. ते आणि पंडित भगवानलाल इंद्रजी हे दोघे, डॉ. भाऊ दाजींच्या बुद्धिमान वारसांपैकी होत. त्यांच्यानंतर प्राचीन भारतीय विद्यांमध्ये मौलिक संशोधन करून हा ज्ञानदीप तेवत ठेवणाऱ्या अनेक अभ्यासू विद्वानांची एक परंपरा चालू राहिली; आणि त्यांच्यांतले सर्वांत अधिक बुद्धिमान म्हणजे भांडारकर.

पौर्वात्य विद्याभ्यासाच्या क्षेत्रात भांडारकरांनी केलेल्या कार्याचे पाच प्रमुख विभागात वर्गीकरण होऊ शकेल. एक थोर इतिहासज्ञ, भारतीय धर्म व तत्त्वज्ञान यांचा सखोल अभ्यासक, संस्कृत पाठ्यपुस्तकांचे चिकित्सक संपादक, भाषाशास्त्रज्ञ व वैयाकरणी आणि इतरांच्या ग्रंथांचे सुजाण परीक्षणकार व टीकाकार म्हणून आपण भांडारकरांना ओळखतो.

**इतिहासकार** :

भांडारकरांनी आपला 'दख्खनचा प्राचीन इतिहास' लिहायला घेतला, त्या वेळी भारतीय इतिहासातील त्या भागावर काही अस्सल लेखन झालेले नव्हते हे कबूल केले पाहिजे. डॉ. भाऊ दाजी व इंद्रजी यांच्या ग्रंथांत शिलालेखांचे व हस्तलिखितांचे संपादन आणि भारताच्या प्राचीन इतिहासाबद्दलच्या विविध खास प्रश्नांवरील मर्यादित संशोधनपर स्फुट लेख यांचा समावेश होता. मंडलिक व पंडितांच्या कार्याबद्दलहि हेच म्हणता येईल. एशियाटिक सोसायटीच्या प्रकाशनांतून राजेंद्रलाल मित्रा बंगालमध्ये अशाच स्वरूपाचे कार्य करीत होते. रमेशचंद्र दत्त यांनी भारताच्या प्राचीन इतिहासावर बरेच लेखन केले यात शंका नाही. परंतु त्यात कल्पकतेचा अभाव असल्याने त्यांचे लिखाण इतिहासाच्या आधुनिक विद्यार्थ्यांसाठी फार मौलिक ठरणार नाही. तेव्हा भारताचा पहिला भारतीय इतिहासकार म्हणजे रामकृष्ण गोपाळ भांडारकर. राजकीय इतिहासाच्या क्षेत्रात त्यांनी दोन अतिशय मौलिक निबंध लिहिले – '**अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन**' (दख्खनचा प्राचीन इतिहास), व '**अ पीप इन् टु दि अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया**' (प्राचीन भारतीय इतिहासात एक दृष्टिक्षेप.)

यापैकी पहिले पुस्तक म्हणजे प्राचीन भारतीय इतिहासात भांडारकरांनी घातलेली सर्वांत महत्त्वाची भर होय. यात आर्यांच्या वसाहतकाळापासून ते १३१८ मधील हिंदु राजवटीच्या अंतापर्यंत – ज्यावेळी अल्लाउद्दीन खिलजीचा मुलगा मुबारकशहा याने दक्षिणेवर हल्ला केला तेथपर्यंतचा दक्षिणेचा इतिहास पहिल्यानेच दिला गेला आहे. '**अ पीप इन् टु दि अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया**' ही एक छोटीशी पुस्तिकाच आहे पण त्यांत बौद्धधर्माच्या उदयापासून ते गुप्त राजवटीतील ब्राह्मणधर्माच्या पुनरुज्जीवनापर्यंतच्या प्राचीन भारतीय इतिहासाचा विश्वसनीय आढावा सोप्या भाषेत कथन केला आहे. भारताचा भूतकाळ पुन्हा उभा करताना पुरातन अवशेष, नाणी, शिलालेख आणि परदेशी प्रवाशांचे लिखाण या

सर्वांचे महत्त्व लेखकाने पटवून दिले आहे आणि अशा रीतीने आदर्श संशोधनाचा नमुना सादर केला आहे. काही खास निवडक विषयांवर त्यांनी अनेक स्फुट लेखहि लिहिले. त्यातला सर्वांत महत्त्वपूर्ण लेख '**क्रिटिकल, कम्पॅरेटिव्ह, अँड हिस्टॉरिकल मेथड ऑफ इन्क्वायरि**' (चिकित्सक, तुलनात्मक व ऐतिहासिक संशोधनपद्धती) हा होय. त्यात प्राचीन भारतीय विद्यांच्या अभ्यासासाठी शास्त्रशुद्ध पद्धतीचा अवलंब करण्याचे जोरदार आवाहन केले आहे.

मायभूमीचे अत्यंत प्रेमी असूनहि ब्रिटिश संबंधाला भांडारकरांनी मनापासून पाठिंबा दिला. ब्रिटन व जर्मनी यांच्याबद्दल खरेखुरे प्रेम असताना आपल्या स्वतःच्या संस्कृति व परंपरेबद्दलच्या आपल्या श्रद्धेत ते यत्किंचितहि कमी पडले नाहीत. आयुष्यभर ते या इंग्रज व जर्मन संस्कृत विद्वानांच्या निकट सहवासात राहिले. भूतकालाचे यथातथ्य चित्रण करणाऱ्या १९ व्या शतकातील एखाद्या इतिहासकारासारखीच त्यांची इतिहासाकडे पाहण्याची दृष्टी होती. '**अ पीप इन टु दि अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया**'च्या प्रस्तावनेत, इतिहासकाराच्या कर्तव्याबद्दलच्या आपल्या कल्पना त्यांनी सारांशरूपाने मांडल्या आहेत त्या अशा :–

> ही सर्व साधने हाताळताना इतिहासकाराने न्यायाधीशाच्या पद्धतीने पुराव्याच्या तत्त्वांचा अवलंब केला पाहिजे. प्रथमतः तो निःपक्षपाती असला पाहिजे. हाती असलेल्या साधनांतून आपल्या देशाचे किंवा वंशाचे वैभव दाखवील असे काहीतरी शोधण्याकडेच त्याचा कल असू नये. तसेच तो देश व त्यातील लोक यांच्याविरुद्ध त्याच्या मनांत पूर्वग्रहहि असू नयेत. वस्तुनिष्ठ सत्यदर्शन हे त्याचे एकमेव उद्दिष्ट असायला हवे. पुराव्याची विश्वसनीयता व आपल्या विधानांची संभाव्यता इतिहासकाराने प्रत्येक बाबतीत पारखून घ्यायला हवी. तो (लेखक) एखादी घटना प्रत्यक्ष पाहिलेला मनुष्य होता की तिचा समकालीन होता, ती घटना सांगत असताना तो अतिशयोक्तीच्या मोहाला बळी पडला आहे का,

> किंवा घटनेच्या अद्‌भुततेने भारावून गेला आहे का हे सर्व, इतिहासकाराने निश्चित करायला हवे. कुठल्याहि प्रचलित आख्यायिका ऐतिहासिक सत्य म्हणून विचारात घेता कामा नयेत; पण वेगळ्या स्वरूपात आढळलेल्या पुराव्यांनी त्यातील सत्याचा असेल-नसेल तो अंश हुडकून काढण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

आज ज्याला आपण इतिहासशास्त्र म्हणतो त्याच्या मूलतत्त्वांशी भांडारकर चांगलेच परिचित होते हे वरील उताऱ्यावरून दिसते.

त्या काळात भारतात पुनर्जागृत झालेल्या राष्ट्रीयत्वाच्या भावनेमुळे लेखकांचा कल भूतकाळातील उज्ज्वल घटनांवरच भर देण्याकडे होता. अशा वेळी भांडारकरांच्या संदेशाचे मोल अधिक होते. इतिहासकाराच्या कार्याला सर्वांत घातक काय असेल तर देशाबद्दलचा कसलाहि पूर्वग्रह; कारण त्यामुळे पूर्वग्रहदूषित व तर्कहीन निष्कर्ष काढण्यास तो हमखास प्रवृत्त होतो. "त्याचे उद्दिष्ट वस्तुनिष्ठ सत्यशोधनाचे हवे" असे सांगणाऱ्या या विद्वानाने आपल्या लिखाणात आपण सांगितलेली तत्त्वे निश्चयाने पाळली. पहिल्या 'प्राच्यविद्या परिषदे'च्या अध्यक्षीय भाषणात अशीच मते त्यांनी मांडली होती. "चिकित्सक विद्वानाने आपले कार्य न्यायालयातील न्यायाधीशाच्या कार्यासारखेच आहे असे मानले पाहिजे. पण तेथेहि मनुष्यस्वभावाच्या दुबळेपणाचा भाग असतोच आणि अनेक वेळा न्यायाची मागणी करण्याची वेळ येते. अशा वेळी जसा दोन न्यायाधीशांमध्ये मतभेद होतो, तसाच मतभेद दोन चिकित्सक विद्वानांमध्येहि होतो." 'काही युरोपीय विद्वानांनी फिर्यादीच्या वकिलाची भूमिका घेतलेली दिसते' या गोष्टीचा निर्देश करून याच व्याख्यानात "आपल्या देशाच्या संस्कृति-विकासावरील बाह्य प्रभाव नाकारणे व आपल्या इतिहासातील काही घटना अति-प्राचीन असल्याचा दावा करणे" या भारतीय विद्वानांच्या सर्वसाधारण प्रवृत्तींवर भांडारकरांनी हल्ला चढविला. भारतीय संस्कृतीवरील ग्रीक, रोमन व ख्रिश्चन प्रभावांबद्दल वाजवीपेक्षा अधिक भर देण्याचा युरोपीय पंडितांचा प्रयत्न आणि काही वस्तुतः प्राचीन

असलेल्या ऐतिहासिक घटना व साहित्यकृती तुलनेने आधुनिक काळच्या ठरविण्याचा त्यांचा कल यांवरहि भांडारकरांनी टीका केली.

प्राचीन भारताच्या कित्येक युरोपीय इतिहासकारांपेक्षा भांडारकर आपल्या सामग्रीविषयी कितीतरी अधिक चिकित्सक होते. कारण त्यांचा विश्वास होता की " कुठल्याहि पुस्तकातील कथनात्मक मजकूर ऐतिहासिक आहे हे मान्य करण्यापूर्वी, त्या लेखकाचा हेतू वाचकाला खुष करण्याचा, त्याला शिकविण्याचा आणि त्याचे कुतूहल चेतविण्याचा आहे की घटना जशा घडल्या तशा नमूद करण्याचा आहे, याचा इतिहासकाराने स्वतःशी विचार करायला हवा." संस्कृत महाकाव्ये व पुराणे या कसोटीला उतरत नाहीत आणि नंतरच्या ग्रंथांतील राजांच्या वंशावळींमध्ये गोंधळ व भ्रष्टाचार आढळतात. शातवाहन राजांच्या पुराणातील नामावळी चिकित्सकपणे हाताळून शिलालेख, नाणी व इतर पुराव्यांच्या आधारे एक कालनिर्णय करण्यात भांडारकरांनी यश मिळविले. बहुतेकांना तो आजहि मान्य आहे. उलट पुराणांकडे भोळ्या विश्वासाने पाहण्याच्या व्हिन्सेंट स्मिथच्या दृष्टिकोनामुळे त्याचा कालनिर्णय आज मानला जात नाही.

प्रार्थनासमाजाचे एक पुढारी व परमेश्वराच्या अस्तित्वावर दृढ श्रद्धा असलेले भांडारकर, इतिहासातील दैवी हस्तक्षेपावरील आपल्या विश्वासाचा कोणताहि पुरावा आपल्या ऐतिहासिक लेखनात मिळणार नाही अशी खबरदारी घेत. त्यांच्या इतिहासविषयक विचारसरणीत अशा कल्पनांना अजिबात थारा नव्हता. भांडारकरांच्या लेखनातील आणखी एक गुणविशेष म्हणजे त्यांची विनम्रता. त्यांच्या **अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन** (दख्खनचा प्राचीन इतिहास) या इतिहासावरील निबंधाच्या प्रस्तावनेत याचे एक उदाहरण मिळते. भांडारकर लिहितात :

> मुसलमानांच्या पूर्वीचा दख्खनचा राजकीय इतिहास आजवर पूर्णपणे अज्ञात असल्यामुळे व घटनांची निश्चिती करणे फारच अवघड असल्यामुळे शक्य तितक्या घटना गोळा करण्याचा माझा

> हेतू आहे... यात साहित्यनिर्मितीचा आव नसून केवळ घटनांचे संकलन आहे.

प्रा. ए. एल्. बॅशम यांनी म्हटले आहे की, "भांडारकरांच्या मते, प्राचीन भारताच्या इतिहासकारापुढील मुख्य प्रश्न 'काय घडले ?' हा होता, 'ते का घडले ?' हा नव्हे. त्यांचा मृत्यू होऊन तीस वर्षे उलटली तरीहि या विषयाच्या अनेक बाजू व कालखंडांच्या बाबतीत पहिल्या प्रश्नाचे उत्तर अद्यापि मिळालेले नाही आणि जोवर पहिल्या प्रश्नाचे उत्तर मिळत नाही, तोवर दुसऱ्या प्रश्नाचे उत्तर मिळविण्याचा प्रयत्न बव्हंशाने तर्काधिष्ठित ठरेल.[1]"

भांडारकर भारतीय धर्म व तत्वज्ञान यांचे सखोल अभ्यासक होते. त्यांचे १९१३ मध्ये प्रसिद्ध झालेले 'वैष्णवधर्म, शैवधर्म, लहानसहान धार्मिक पंथ' यांवरचे अभिजात लेखन, डॉ. बुल्लर यांच्या **एनसायक्लोपीडिया ऑफ इंडो-आर्यन रिसर्च**मधील सर्वोत्कृष्ट लेखनाच्या तोडीचे ठरते. या विश्वकोशाच्या (मॅग्नम ओपस) संपादकाने व्यक्त केलेल्या उत्कट कृतज्ञ भावातून त्याचे मूल्यमापन योग्य रीतीने अजमावता येण्यासारखे आहे.

> हा अत्युत्तम ग्रंथ पुरा केल्याबद्दल मी आपले अभिनंदन करतो. आपल्यासारख्या पारंगत व्यक्तीकडून या विषयांवर एखादे पुस्तक लिहीले जाण्याची पाश्चात्य विद्वानांना कित्येक दिवसांपासून निकड वाटत होती. तेव्हा विशेषत: या विद्वानांत या ग्रंथाने अतिशय गोडी उत्पन्न केली आहे यात शंका नाही. आपली दृष्टी अजून अधू असल्याचे ऐकून मला फार वाईट वाटले आणि तरी ज्या उमेदीने इतक्या उत्तम रीतीने आपले काम पूर्ण करण्यात आपण यश मिळविलेत, ती मला अधिकच प्रशंसनीय वाटते.

भारतातील धर्मपद्धतींचा अभ्यास करण्याचा या विद्वानाचा

---

१. 'स्टडीज् इन इंडियन हिस्टरी अँड कल्चर', १९६४, पृ. २२१

विश्लेषणात्मक व उत्कृष्ट दृष्टिकोण वैष्णवधर्माच्या विचारप्रणालीवरील त्यांच्या प्रतिपादनाचे उदाहरण घेऊन उत्तम रीतीने दाखवता येईल.

बौद्ध व जैन धर्मांना जन्म देणाऱ्या पंथासारखा, पण अस्तित्व-वादी तत्त्वांवर आधारलेला एक धर्मपंथ इ. स. पूर्व ५ व्या शतकात उदयास आला. याचे आरंभीचे नाव 'एकान्तिक धर्म' म्हणजेच —एकनिष्ठ प्रेम व भक्ति यांचा धर्म—असे होते. लवकरच पंचरात्र वा भागवत धर्माच्या रूपाने त्याला पंथीय स्वरूप प्राप्त झाले. याला पुन्हा 'अखिल मानवजातीचे उगमस्थान' अशा नारायण पंथाची जोड मिळाली. ख्रिस्ती शकानंतर लवकरच अभिर या धनगर जमातीने आपल्या जमातीचा नायक 'कृष्ण' याची या पंथाला देणगी दिली. आठव्या शतकात, भक्ति किंवा प्रेम हा ज्याचा प्रधान विशेष होता अशा या धर्माचा, शंकराचार्यांनी पुरस्कारलेल्या पारमार्थिक अद्वैतवाद व जगन्मिथ्या तत्त्वज्ञानाशी संपर्क आला. या पारमार्थिक अद्वैतवादाबद्दलचा वैरभाव ११ व्या शतकात कळसाला पोहोचला, ज्यावेळी त्या धर्माला दूर सारून त्या जागी भक्ति व प्रेमाच्या धर्माला पुन्हा बळकटी आणण्याचे जोरदार कार्य रामानुजांनी केले. उत्तरेत निम्बार्काने त्यांचेच अनुकरण केले. अहीर-तत्त्वाचा पुरस्कार करून कृष्णाची प्रेयसी राधा हिच्या पंथाची त्याने जोड दिली. याच धोरणाचा १३ व्या शतकात माधव किंवा आनंदतीर्थ यांनी अवलंब केला. यांनी ईश्वराच्या अनेक-त्वाचे तत्त्व प्रस्थापित केले व विष्णू या दैवताला सर्वोच्च परमेश्वर म्हणून प्रतिष्ठा मिळवून दिली. उत्तरेत रामानंदाने रामाच्या पंथाची भर घातली व त्याचा वारस रामानुज याने नारायणाच्या, १५ व्या शतकात कबीराने कडवा एकेश्वरवाद व रामपंथ यांची शिकवण देऊन मूर्तिपूजेचा धिक्कार केला. १६ व्या शतकात वल्लभाने कृष्ण व राधा यांच्या शृंगारिक पंथाची स्थापना केली आणि चैतन्याने बंगालमध्ये प्रौढ कृष्ण व राधा पंथ स्थापन केला;

याच भ्रष्टतेमुळे वैष्णवधर्माला उतरती कळा लागली. दक्षिणेत नामदेव व तुकारामाने राधा-कृष्ण यांची उपासना नाकारली व अधिक सभ्य असा उपासनेचा प्रकार सजविला. आपल्या विचारांचा प्रचार संस्कृतमधून न करता तो त्यांनी देशी भाषांतून केला. तसेच त्यांनी विशुद्ध ईश्वर-प्रेमाची शिकवण दिली आणि मोक्षासाठी वैयक्तिक मनःशुद्धी व नीतिमत्तेच्या आवश्यकतेवर भर दिला"

भांडारकरांचे आणखी उल्लेखनीय कार्य म्हणजे महाभारत, पाणिनि व पतञ्जलि यांच्या कालनिर्णयावरील त्यांचे लेख.

पांडव वंशातल्या परिक्षिताचा मुलगा जनमेजय याच्या एका बनावट हकीकतीच्या आणि त्यावरून काढलेल्या खगोलशास्त्रीय माहितीच्या आधाराने, इ. स. १५२१ नंतर महाभारत लिहिले गेले असे सिद्ध करण्याचा कर्नल एलिस यांनी प्रयत्न केला. इतके प्राचीन ग्रंथ मुद्दाम आधुनिक काळात आणून बसविण्याचा काही युरोपीय पंडितांचा हा प्रयत्न भांडारकरांना मानवला नाही. त्यांची मते खोडून काढताना पाणिनि व अश्वलायन यांच्या काळापासून म्हणजे इ. स. पूर्व ५ व्या शतकापासून सारंगधराच्या काळापर्यंत, म्हणजे १४ व्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंत महाभारताचा काळ असल्याचे सिद्ध करण्यासाठी भांडारकरांनी भरपूर पुरावा गोळा केला '**ॲल्युझन्स टू कृष्ण इन् पतञ्जलीज महाभाष्य**' (पतञ्जलीच्या महाभाष्यातील कृष्णाचे उल्लेख) या आपल्या आणखी एका लेखात त्यांनी दाखवून दिले की कंसवध व बलिबंध या कथा पतञ्जलीच्या काळात लोकप्रिय व प्रचलित होत्या; कृष्ण किंवा वासुदेवाने कंसाचा वध केल्याचा उल्लेख या कथेत आहे; नाटचप्रयोगासाठी अशा कथा चांगले विषय पुरवीत; आजहि हिंदु रंगभूमीवर सादर केलेल्या पौराणिक कथा लोकप्रिय ठरतात. कृष्णाच्या हातून कंसवध फार पूर्वीच्या

---

१. 'कलेक्टेड वर्क्स्' मधील 'वैष्णविझम्, शैविझम ॲंड मायनर रिलीजिअस सिस्टीम्स्', खंड ४, पृष्ठे. १४२ ते ४४.

काळात घडला अशी पतञ्जलीच्या काळी समजूत होती. चर्चेचा समारोप करताना भांडारकर म्हणतात :

> इ. स. पूर्व दुसऱ्या शतकाच्या मध्यावर लिहिल्या गेलेल्या एका ग्रंथातील सात उतारे मी येथे एकत्र केले आहेत. यावरून असे कळते की कृष्णाबद्दलच्या कथा व कृष्णाची, एक देव म्हणून उपासना या गोष्टी युरोपीय पंडित ठरवितात तेवढ्या अर्वाचीन नाहीत. ख्रिस्ताला कृष्णाचे मूळ रूप मानणाऱ्या, व बायबलला गीतेचा उगम मानणाऱ्या आणि आमचे पौराणिक वाङ्मय हा केवळ नंतरचा विस्तार आहे अशी समजूत असणाऱ्या त्या युरोपीय विद्वानांचे या उताऱ्यांकडे मी लक्ष वेधू इच्छितो. "

पाणिनि व पतञ्जलि यांच्या काळाबद्दल अत्यंत बहुमोल लेखन करताना भांडारकरांनी प्रा. वेबर व पीटरसन यांना जी उत्तरे दिली आहेत त्यांत भांडारकरांचे तेजस्वी वादचातुर्य विशेषत्वाने दिसून येते. कात्यायनाने एका वार्तिकात (नियम) असे सांगितले आहे की, वक्त्याने प्रत्यक्ष न पाहिलेली पण तो पाहू शकला असता अशी आणि जी लोकांना साधारणतः माहीत आहे अशी एखादी घटना दर्शविताना अपूर्ण भूतकाळाचा प्रयोग करावा या वार्तिकाच्या आधारे भांडारकरांनी निर्णायक रीतीने सिद्ध केले की पतञ्जलीच्या काळात कोणत्यातरी यवन राजाने साकेत व माध्यमिका यांना वेढा घातला असला पाहिजे. कात्यायनाच्याच आणखी एका वार्तिकाकडे भांडारकर लक्ष वेधतात. यात तो म्हणतो की एखादी घटना किंवा क्रिया सुरू झाली आहे पण संपलेली नाही अशा वेळी ती दाखविताना वर्तमानकाळाचा (लट्) उपयोग करावा. याचे स्पष्टीकरण देताना, पतञ्जलीच्या लेखनकाळी पुष्यमित्र नावाचा एक मनुष्य होता व त्याच्या आदेशानुसार त्याच्यासाठी एक मोठा यज्ञ करण्यात आला होता, असे भांडारकरांनी यशस्वीपणे दाखवून दिले आहे.

अनेक संग्रहग्रंथांचा उल्लेख करून त्यात पाणिनीच्या नावावर असलेल्या एका श्लोकाच्या आधारे पाणिनि सातव्या शतकात होता असे मत

पीटरसन यांनी मांडले होते. भांडारकरांनी त्यांना एक विस्तृत उत्तर देऊन त्यांच्या या मताचा धुव्वा उडवून दिला. ग्रीक, चिनी इत्यादी पुराव्यांच्या आधारे पाणिनीचे अति-प्राचीनत्व शोधताना तो अलेक्झांडरच्या काळा-पूर्वीचा विद्यमान होता असे भांडारकरांनी सिद्ध केले. भांडारकर म्हण-तात, " हा विवाद्य श्लोक त्याच नावाच्या दुसऱ्या लेखकाने लिहीलेला असावा असेच मानावे लागेल. " स्कंधगुप्ताच्या पुष्यमित्रावरील विजया-बद्दल सांगणाऱ्या भितारी-स्तंभावरील कोरीव लेखाचा तेवढा आधार घेऊन, इ. स. ४६५ मध्ये राज्य करीत असलेल्या गुप्त घराण्यातील स्कंध-गुप्ताच्या काळात पतञ्जलि होता असे जे मत पीटरसन यांनी मांडले त्यातहि भांडारकरांना अजिबात अर्थ दिसत नाही.

या मतप्रणालीत काही अंगभूत अडचणी होत्या. पतञ्जलीचा पुष्य-मित्र ज्या काळात होता त्या काळात चंद्रगुप्त या आणखी एका थोर राजाच्या आठवणी पुसल्या गेलेल्या नव्हत्या. धर्माज्ञेप्रमाणे कोणत्याहि सार्वभौम राजाने केला पाहिजे असा अश्वमेध यज्ञ त्याने केला होता. ज्या काळात देशावर यवनांच्या धाडी येऊ लागल्या होत्या त्याच काळातला तो असावा. याउलट भितारी शिलालेखातील पुष्यमित्राचे उल्लेख ही अपेक्षा पूर्ण करीत नाहीत. पतञ्जलीने उल्लेखिलेला ग्रीक आक्रमक आणि साकेत व माध्यमिक यांना वेढा घालणारा कनिष्क — माध्यमिक याचा अर्थ इथे नागार्जुनाने स्थापिलेला बौद्धपंथ — यांचे ऐक्य मानून त्या आधारे पत-ञ्जलीचा काळ इ. स. २५ पर्यंत पुढे आणावा असे जे मत प्रा. वेबर यांनी मांडले, तेहि भांडारकरांनी अमान्य केले. कनिष्काने बौद्धांचा छळ केल्याचा काहीच पुरावा उपलब्ध नाही. शिवाय कर्नचा आधार घेऊन भांडारकरांनी दाखवून दिले की गोल्डस्टकर व वेबर दोघांनीहि माध्यमिकाचा चुकीचा अर्थ लावला आहे. विशिष्ट स्थळी राहणारी माणसे असा त्याचा अर्थ होय. पतञ्जलीचे परंपरेने मानलेले जन्मस्थान गोनर्द म्हणजे आजचे गोंदा असेहि ते निदर्शनास आणून देतात. कात्यायनाला पूर्वेकडचा मानण्यातही वेबर व गोल्डस्टकर यांची कशी चूक झाली आहे; तो बहुतांशाने दक्षिणेकडचा

रहिवासी कसा होता हे भांडारकरांनी दाखवून दिले आहे. पतञ्जली पुष्य-मित्र शुंगाच्या कारकीर्दीतला. आपल्या **भाष्याचे** तिसरे प्रकरण त्याने बहुधा इ. स. पूर्व १४४ व इ. स. पूर्व १४२ या दरम्यान लिहिले असे भांडारकरांनी निर्णायकपणे सिद्ध केले. म्हणूनच संस्कृत वाङ्मयाच्या इतिहासाच्या दृष्टीने हा शोध फार महत्त्वाचा ठरतो.

भांडारकरांनी खोडून काढलेल्या या विचारप्रणाली आता प्रचलित नाहीत आणि आपल्या इतिहासाच्या ज्ञानाची आजची स्थिती लक्षात घेता त्या मुळीच महत्त्वाच्याहि नाहीत. पण आजहि वादग्रस्त असलेल्या राम-गुप्त प्रश्नाइतक्याच वादग्रस्त अशा त्या समकालीन मतप्रणालींशी इतक्या जिद्दीने वादविवाद करताना बहुश्रुतता व निःपक्षपाती बुद्धिमत्ता या गोष्टींची किती आवश्यकता होती हे आपल्याला चांगलेच समजून येते.

'**इंडियन अँटिक्वेरी**'साठी भांडारकरांनी लिहिलेला '**वेदाज् इन इंडिया**' हाहि लेख लक्षणीय आहे. या लेखात वैदिक मंत्रपठनाची माहिती दिली आहे व त्यायोगे वैदिक विद्वानांनी भाषाशास्त्रात किती भरीव कामगिरी केली आहे हे दाखविले आहे. वेदांची शुद्धता कायम राहण्याचे श्रेय, सर्वस्वी या पाठांतराच्या पद्धतीला व प्रत्येक शब्द किंवा उच्चारहि अत्यंत बिनचूक करण्याला या पाठांतरकारांनी जे अतिशय महत्त्व दिले आहे, त्याला दिले पाहिजे. यानंतरची भांडारकरांची कामगिरी म्हणजे, १८७४ मध्ये लंडन येथे भरलेल्या प्राच्यविद्यातज्ञांच्या पहिल्या परिषदे-साठी लिहिलेला **नासिक केव्ह इन्स्क्रिप्शन्स** (नाशिकच्या लेण्यातील शिला-लेख) चा अभ्यास करणारा लेख. १८७० मध्ये माणेकजी अदारसी या पारशी गृहस्थाने भांडारकरांना एक ताम्रपट आणून दिला तेव्हापासून त्यांना शिलालेखशास्त्रात गोडी वाटू लागली. त्यावेळी प्राचीन भारतीय विद्यांच्या या शाखेशी भांडारकर अजिबात परिचित नव्हते. तेव्हा प्रथम त्यांनी थॉमस व प्रिन्सेप यांच्या पुस्तकांचा अभ्यास केला व नंतर 'रॉयल एशियाटिक सोसायटीच्या' मुंबई शाखेपुढे त्यांनी एक संशोधनपर लेख वाचला. '**नासिक केव्ह इन्स्क्रिप्शन्स**' या लेखात शिलालेखीय माहिती व

इतर वाङ्मयीन आणि नाणेशास्त्रातील पुरावे यांचा तुलनात्मक अभ्यास त्यांनी सादर केला; आणि यातून शातवाहनांच्या कारकीर्दीतील दक्षिणेचा कालानुक्रम, राजकीय इतिहास व सांस्कृतिक स्थिती यावर नवा प्रकाश टाकण्यात ते यशस्वी झाले. याच स्वरूपाच्या **अ संस्कित इन्स्क्रिप्शन फ्रॉम जावा** (जावामधील एक संस्कृत शिलालेख) या लेखात भारत-जावा यांच्यांत असलेल्या सांस्कृतिक संबंधांच्या इतिहासाचा शोध त्यांनी घेतला आहे. आपल्या वाडवडिलांचे उज्ज्वल उदाहरण समोर ठेवण्यासहि ते भारतीयांना सांगतात.

इ. स. १८७७ मध्ये, मुंबई विद्यापीठाने सुरू केलेल्या ' विल्सन भाषा-शास्त्रीय व्याख्यानमाले'त पहिले व्याख्यान देण्याचा मान भांडारकरांना मिळाला. १८६४ मध्ये जेव्हा दक्षिणा फेलो या नात्याने डेक्कन महा-विद्यालयात त्यांना शिकवावे लागत होते; तेव्हापासूनच त्यांना भाषा-शास्त्रात गोडी लागली होती. आपल्या वार्षिक अहवालात ते म्हणतात :

> पहिल्या वर्गाला दिलेल्या माझ्या व्याख्यानांमध्ये मराठी भाषेचा इतिहास व विकास यांचा परामर्ष मी घेतला. संस्कृतच्या अप-भ्रंशातून प्राकृत भाषा निर्माण झाल्या व त्यांच्यापैकी एकीत पुढे विकास किंवा बदल होऊन आपली आजची आधुनिक मराठी तयार झाली. मराठी शब्दांची त्यांच्या प्राकृत, महाराष्ट्री व संस्कृत रूपांशी तुलना करून मी हे सिद्ध केले.

या मालेतील पहिले व्याख्याते या नात्याने त्यांनी **संस्कृत व त्यापासून उत्पन्न झालेल्या प्राकृत भाषा** हा विषय आपल्या व्याख्यानासाठी निवडला. 'प्राकृत'चा व्यापक अर्थ घेऊन त्यांनी त्यात आजच्या उत्तर हिंदुस्थाना-तील देशी भाषांचा समावेश केला.

" मूळ संस्कृतापासून आधुनिक देशी भाषांचा सप्रमाण अशा विका-साच्या विविध टप्प्यांतून शोध घेताना व वेगवेगळ्या स्थित्यंतरांची नैसर्गिक किंवा भौतिक, वांशिक व ऐतिहासिक कारणे निश्चित करताना, प्रस्तावनेत निर्देश केल्याप्रमाणे त्यांनी काटेकोरपणे ऐतिहासिक पद्धतीचा

अवलंब केला. "–भारताच्या भाषाशास्त्रीय इतिहासातील विस्कळीत भागांचा कसून अभ्यास झालेला आहे; पण ऋग्वेदिक भाषेपासून भारताच्या आधुनिक देशी भाषांपर्यंतच्या भाषाशास्त्रीय विकासाचे इतके समग्र व व्यापक चित्र इतरत्र कोठेहि अस्तित्वात नाही. –ही १९२१ साली या व्याख्यानांची विंडीश याने केलेली प्रशंसा आजहि समर्पक ठरते.

संस्कृतच्या पाठ्यपुस्तकांच्या त्यांनी तयार केलेल्या चिकित्सक आवृत्त्यांत, भवभूतीच्या **मालतीमाधव**चा उल्लेख करायला हवा. प्रस्तावनेत भांडारकरांनी ८ व्या शतकात होऊन गेलेल्या या कवीच्या जीवनेतिहासाचा शोध घेतला आहे. बौद्ध धर्माच्या ऱ्हासानंतर सुरू झालेल्या व ब्राह्मणधर्म व वाङ्मय यांच्या पुनरुत्थानाच्या रूपाने कळसाला पोहोचलेल्या पुनरुज्जीवनाच्या पुनर्जागृतीच्या, काळात भवभूति होऊन गेला. कालानुक्रमाने '**मालतीमाधव**' ही या कवीची दुसरी साहित्यकृति. या कवीचा आश्रयदाता, कनोजचा राजा यशोवर्मा, याच्या जीवनाशी संबंधित अशा घटनांचीहि चर्चा भांडारकर करतात. या कवीच्या कुटुंबाची वंशपरंपरा आणि त्याची विद्या यासंबंधीची माहितीहि त्यांनी दिली आहे. ही आवृत्ति भांडारकर आपले गुरू ई. जे. हॉवर्ड यांना अर्पण करतात ही गोष्ट आपल्याला विशेष लक्षणीय वाटते : ज्यावेळी आपल्या महाविद्यालयांतून दिल्या जाणाऱ्या शिक्षणात संस्कृतचा समावेश नियमित अभ्यासक्रमात नव्हता, त्यावेळी त्यांच्या बोधपूर्ण उत्तेजनाशिवाय प्रस्तुत संपादक आपल्या देशाची ही पवित्र भाषा कदापीहि शिकण्याची शक्यता नव्हती.

भांडारकर इतरांच्या पुस्तकांचे सुजाण परीक्षणकार व टीकाकार होते. मार्टिन हॉगचे **एतरेय-ब्राह्मण,** गोल्डस्टकरचे **पाणिनी** व व्हिसेंट स्मिथचे **अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया** या पुस्तकांच्या त्यांनी केलेल्या परीक्षणांवरून त्यांची गुणवत्ता अजमावता येते. या विद्वानांच्या विद्वत्तेबद्दल अतिशय आदर असूनहि त्यांच्या उणीवांकडे भांडारकरांनी दुर्लक्ष केले नाही. उदाहरण म्हणून त्यांचे एक विधान घेता येईल. " नेहमीच नाही तरी

बऱ्याच वेळा युरोपीयांपेक्षा संस्कृतच्या एतद्देशीय विद्यार्थ्यांच्या म्हणण्याची दखल घेतली जाणे अधिक योग्य ठरते. " सामान्य लोकांसाठी भारताचा इतिहास लिहिताना लेखकांना कोणत्या गोष्टी लक्षात ठेवण्याची आवश्यकता असते हे स्मिथच्या पुस्तकाचे परीक्षण करताना भांडारकरांनी नमूद करून ठेवले आहे :

> संशयातीत अशा ढोबळ व प्रमुख घटना त्याने प्रथम दिल्या पाहिजेत; आणि त्याला जर तपशीलात शिरावयाचे असेल तर त्या घटना सर्व विद्वानांनी मान्य केलेल्या किंवा निर्दोष पुराव्यावर आधारलेल्या असल्या पाहिजेत. एखाद्या प्रश्नाबद्दल विभिन्न मते नमूद केलेली असली तरी ती सगळी मते लिखाणात दिली पाहिजेत; नाही तर त्या प्रश्नाचा विचार पूर्णपणे सोडून दिला पाहिजे. सर्व उपलब्ध पुराव्यांची छाननी केली पाहिजे आणि निश्चित केलेल्या गोष्टी आधी ज्ञात असलेल्या इतर गोष्टींशी विरोध उभा करतील अशा तऱ्हेने निगडीत किंवा संयोजित करता कामा नयेत. ज्याविषयी अधिकृत माहिती नाही असे एकहि विधान त्याने करता कामा नये व प्रत्येक बाबतीत पदटीपांमध्ये संदर्भ दिले पाहिजेत.

भांडारकरांनी केलेल्या भव्य संशोधन कार्यात त्यांचा **रिपोर्ट ऑन दि सर्च फॉर संस्क्रित मॅन्युस्क्रिप्ट्स्** (संस्कृत हस्तलिखितांच्या शोधाचा अहवाल) सर्वश्रेष्ठ ठरतो. सहा खंडांत हा प्रसिद्ध झाला असून प्राचीन भारतीय वाङमयाच्या इतिहासाचे ते एक साधन आहे. या हस्तलिखितांच्या काळजीपूर्वक अभ्यासातून जी ऐतिहासिक माहिती उघडकीस आली आहे तिने भारताच्या प्राचीन इतिहासातील अनेक निखळलेले दुवे जोडले गेले आहेत. हस्तलिखिते शोधून गोळा करताना, त्यांचा कालनिर्णय करताना व त्यातून मिळालेल्या माहितीवरून भारताच्या राजकीय, धार्मिक व सामाजिक परिस्थितीची नव्याने उभारणी करण्याचा प्रयत्न करताना भांडारकरांना जे अपार परिश्रम करावे लागले त्यावरूनच त्यांचे महत्त्व सिद्ध होते. या संशोधनाच्या दरम्यान भांडारकरांना जैन हस्तलिखितेहि

पाहायला मिळाली व त्या धर्माच्या तत्त्वज्ञानाचा उगम व विकास समजून घेण्यासाठी त्यांची आणखी मदत झाली. त्यांनी पुढे वैष्णवमत व शैवमत यांच्या विकासातील वेगवेगळ्या टप्प्यांचा जो अभ्यास सुरू केला त्याचा उगम या संशोधनातच होता. ऐतिहासिक साधनांचे भांडारच बनलेल्या या अहवालांमुळे थोर प्राच्यविद्यातज्ञांत भांडारकरांचे स्थान कायमचे मुक्रर झाले. या हस्तलिखितांत भारतीय तत्त्वज्ञानाच्या प्रणाली, जैन वाङ्मय, धर्मशास्त्र, काव्य, शब्दकोश, ज्योतिष, याज्ञिक विधी व पौर्वात्य विद्येच्या आणखी इतर शाखा इत्यादी विषयांचा विचार केलेला आहे. त्या सर्वांचीच सविस्तर माहिती देणे शक्य नाही, पण उदाहरणा-दाखल काहींचा उल्लेख करता येईल. त्यांपैकी काही असे. विद्याधराची '**एकावली** व त्यावरील' '**मल्लीनाथाची टीका**' बल्लाळसेनाचे '**अद्भुत-सागर**', जल्हणाचे '**सूक्तिमुक्तावली**' व सोमेश्वराचे 'सुरतोत्सव.'

भांडारकर संबंध आयुष्यभर विद्याभ्यासात गुंतलेले होते. आपल्या आयुष्याच्या अखेरीस १९१६ मध्ये प्राचीन भारतीयविद्यांचा अभ्यास कर-णाऱ्या तरुण पिढीला त्यांनी एक व्याख्यान दिले आहे, त्यात त्यांनी 'संस्कृत वाङमयाच्या संशोधनाच्या नव्या दिशा' (फ्रेश लाईन्स ऑफ रिचर्स इन संस्क्रित लिटरेचर') सुचविल्या आहेत. वयाची ऐंशी वर्षे उलटल्यावरहि त्यांच्यात वृद्धत्वाचा कुठे लवलेशहि नव्हता हे यावरून दिसते, आणि पायथागोरसने सत्तरी उलटलेल्या माणसांची गणना जिवंत माणसांत केलेलीच नाही हे आठवले की हे विशेषच जाणवते.

**सन १८८६ च्या व्हिएन्ना परिषदेत भांडारकर**

व्हिएन्ना परिषदेतील भांडारकरांचे संस्मरणीय कार्य हे त्यांच्या आयु-ष्याचे एक उज्ज्वल पर्व गणले जाईल. भारताच्या सांस्कृतिक वारश्याचे ते खरेखुरे प्रतिनिधी होते. पौर्वात्य विद्या व संशोधन यांत दिसून येणाऱ्या भारतीय विद्वत्तेचा त्यांनी पुरावा दिला आणि बुद्धिमत्तेत भारतीय लोक रेसभरहि कमी दर्जाचे नाहीत; उलट काही बाबतींत ते वरचढ आहेत हे सिद्ध करून दाखविले.

दि. ११ फेब्रुवारी १८८७ ला ' रॉयल एशियाटिक सोसायटी'च्या मुंबई शाखेपुढे त्यांनी जो एक संशोधनपर लेख वाचला त्यात त्यांनी व्हिएन्नाच्या प्राच्यविद्यापरिषदेची मोठी वेधक हकीकत दिली आहे. तेथे डॉ. रोस्ट, डॉ. एग्लींग व डॉ. ऱ्हिस डेव्हीड्स् यांना ते भेटले. ऱ्हिस डेव्हीड्स् यांच्याशी बौद्ध अध्यात्मापासून इंग्रजी व भारतीय राजकारणापर्यंत वेगवेगळ्या विषयांवर त्यांचे रंजक व लांबलचक बोलणे झाले. बुद्धकालीन प्राचीन भारताच्या धार्मिक व तत्त्वज्ञानात्मक विचारातील स्वातंत्र्य, निर्भयता व सत्यवादित्व ऱ्हिस डेव्हीड्स् यांना फार प्रशंसनीय वाटले. आधुनिक जगात त्याच्याशी समतुल्य काहीहि नाही असे त्यांचे मत पडले. गाढ आंतरिक शांति, अक्षुब्ध वासना, पावित्र्य, सात्त्विक व ज्ञानात्मक स्थिती या सर्वांचा उपभोग घेणारा तो ' अर्हत् ' (मुक्त) ही बौद्धांची आदर्शाची कल्पनाहि त्यांनी विशद केली. ऱ्हिस डेव्हीड्स्सारख्या पालीच्या इतक्या उत्साही विद्वानाला उपजीविकेसाठी बारमध्ये काम करावे लागावे व त्यामुळे आपला सर्व वेळ अभ्यासासाठी देता येऊ नये हे पाहून भांडारकर फार अस्वस्थ झाले. यानंतर, त्यांच्या आयुष्यावर गाढ संस्कार करणारे त्यांचे जुने अध्यापक सिडने ओवेन यांना भांडारकर भेटले. पण सर्वांत संस्मरणीय मुलाखत म्हणजे प्रा. मॅक्स मुल्लर यांच्याबरोबरची. आपल्या लाडक्या मुलीच्या मृत्यूमुळे दुःखी मनःस्थितीत असूनसुद्धा त्यांनी तास दीड तास मोठे मनोरंजक संभाषण केले. आपला आत्मा हा ब्रह्मरूप किंवा परमात्मारूपच आहे हे एखाद्याला कळले म्हणजे जीवनाची अतर्क्यता व रहस्य संपते या वेदान्तातील तत्त्वावर ही चर्चा केंद्रित झाली होती. या जर्मन विद्वानाशी भांडारकर पूर्ण सहमत नव्हते. शंकराचार्यांच्या तत्त्वप्रणालीप्रमाणे ' मी ब्रह्म आहे ' या ज्ञानापर्यंत माणसाने पोहोचले पाहिजे हे जरी खरे, तरी या मोक्षाच्या अथवा निर्वाणाच्या अवस्थेत प्रवेश करण्यापूर्वी मीपणाची भावना किंवा अहंकार नाहीसा होणे आवश्यक आहे; त्या अवस्थेत शिरण्यास ती एक जरुरीची अट आहे. मीपणाची जाणीव हे अज्ञानाचे पहिले फळ होय, आणि मुक्तावस्थेत

त्याचा नाश झाला पाहिजे. मुक्त झाल्यावर आत्म्याला वैयक्तिक जाणीव उरलेली नसते त्या अवस्थेत ' मी ब्रह्म आहे. ' हे ज्ञान त्याला होऊच शकत नाही. भांडारकरांनी पुढे असे स्पष्टीकरण केले की या तत्त्वाचा अर्थ " कुठल्याहि विचाराशी वा भावनेशी जखडलेला दुःखी व पापी क्षुद्र आत्मा मी नाही; तर मी मुक्त, आनंदमय, अविकारी व असिमित आत्मा आहे. " भांडारकरांच्या मते शंकराचार्यांची कल्पना जगन्नियंत्या परमेश्वराशी एकरूप होण्याची नसून आत्मा खरोखर आनंदमय व निरूपाधी होण्याची आहे. या छोटयाशा पण सुंदर भेटीची आठवण म्हणून प्रा. मॅक्समुल्लर यांनी भांडारकरांना आपल्या **अॅनेक्डोटा ऑक्सोनोंसियाच्या** चार भागांची एक प्रत भेट दिली व शेवटी या विद्याक्षेत्रात भांडारकरांनी केलेल्या कामगिरीबद्दल प्रशंसोद्गार काढले.

इ. स. १८८६ च्या, सप्टेंबर महिन्याच्या २५ तारखेला भांडारकर व्हिएन्नाला पोहोचले. या परिषदेला प्रचंड मेळावा जमलेला होता. इजिप्त, तुर्क, चीन व जपान यांसारख्या अनेक जवळच्या व दूरच्या देशांनी तेथे आपली हजेरी लावली होती. प्रा. रॉथ, प्रा. वेबर, प्रा. बुल्लर, प्रा. किलहॉर्न, प्रा. लुडविग, प्रा. जेकोबी, प्रा. ल्युमान, प्रा. जॉली, प्रा. विंडीश, प्रा. होर्नले, प्रा. मॅकडोनेल् व प्रा. स्टेन हे विद्वान तेथे हजर असलेल्यांत नामांकित प्रतिनिधी होते.

### परिषदेतील आर्यविभाग

या विभागात पहिल्या दिवशीच्या सभेत भांडारकरांनी हस्तलिखितांच्या संशोधनावरील आपल्या अहवालातील काही भाग वाचले. तसेच त्यांनी एका जैन ग्रंथाचे जुन्या ताड-पत्रावरील हस्तलिखित सभेपुढे ठेवले. त्याने बरीच उत्सुकता निर्माण केली आणि एका विद्वानाने सांगितले की जैनांच्या धर्म-वाङमयातील ' पूर्वा ' नावाच्या शाखेच्या पूर्वा साहित्यातील हे लेखन आहे; काहींच्या समजुतीप्रमाणे इतर शाखांपेक्षा ही शाखा अधिक प्राचीन आहे.

परिषदेच्या अखेरच्या बैठकीत नामांकित व्यक्तींच्या त्या मेळाव्याच्या गौरवार्थ भांडारकरांनी वेगवेगळ्या वृत्तात स्वतः रचलेले काही श्लोक म्हटले. काही जर्मन विद्वानांना प्रत्यक्ष उच्चारात स्वर कसे सूचित केले जातात हे जाणून घेण्याची उत्सुकता असल्यामुळे भांडारकरांनी भारतातील वैदिक ब्राह्मण म्हणत त्या पद्धतीने ऋग्वेदातील काही ऋचा म्हणून दाखविल्या. भारतातील प्राचीन वाङ्मयाच्या अभ्यासाला सबंध आयुष्य वाहून घेतलेल्या, वेगवेगळ्या देशांतील विद्वानांनी एकत्र जमण्याचे ते दृश्य संतोषकारक होते. याज्ञवल्क्याच्या नेतृत्वाखाली अनेक ऋषींच्या उपस्थितीत भरलेल्या जनकसभेचा उल्लेख, **बृहदारण्यकोपनिषदात व वायुपुराणात** आहे, तिचे स्मरण भांडारकरांना झाले. या विद्वत्तापूर्ण विषयावर भांडारकरांनी गौरवपर श्लोक रचले. त्यांच्या काव्याची कल्पना अशी होती : मिथिला या विदेहराजाच्या राजधानीत, अश्वमेध यज्ञाच्या निमित्ताने भरलेली, देव व माणसांनी भूषविलेली ही पवित्र व विद्वान ऋषींची सभाच, माणसाबद्दलच्या करुणेमुळे, या पापी कलियुगात भूतलावर पसरलेला अंधःकार नाहीसा करण्यासाठी ऑस्ट्रियाच्या सम्राटाची राजधानी ' व्हिएन्ना ' येथे पुन्हा अवतरली आहे. जनकाचा पुरोहित अश्वाल, बुल्लर यांच्या रूपाने तर याज्ञवल्क्य वेबर व रॉथ यांच्या रूपाने व शाकल, किलहॉर्न यांच्या रूपाने अवतीर्ण झाले आहेत; कहोदाने स्वतःला जॉली यांच्या रूपात मूर्त केले आहे; आणि इतर ऋषी, लुडविग, रोस्ट जेकोबी इत्यादींच्या स्वरूपात प्रकट झाले आहेत. व्हिएन्नाची एक स्त्री या विभागाच्या सर्व सभांना उपस्थित राहिली होती व भारतीय वाङ्मयात तिने अतिशय रस घेतला. त्याबद्दल लिहिले गेलेले जवळजवळ सर्व लिखाण, तसेच संस्कृत ग्रंथांची भाषांतरेहि तिने वाचलेली होती. तीच जणू गार्गी वाचकनवी.

भारताच्या या धर्मभाषेच्या व वाङ्मयाच्या अभ्यासात या जर्मन विद्वानांनी घातलेल्या भरीबद्दल भांडारकरांना विलक्षण कौतुक वाटत होते. त्यांनी युरोपच्या प्राचीन भाषांचे संस्कृतशी असलेले नाते यशस्वीपणे

प्रस्थापित करून त्याचा शास्त्रीय तत्त्वांच्या आधारे अभ्यास केला. येवढेच नव्हे तर भारतातील आर्य लोक हे प्राचीन ग्रीक व रोमन लोकांच्या वंशाचे असल्याचेहि त्यांनी सिद्ध केले. याशिवाय त्यांनी भारताच्या सर्व भागांतून हस्तलिखिते गोळा केली, वेदांचा काळजीपूर्वक अभ्यास केला व आर्यांचा इतिहास शोधून काढला. महाकाव्ये, पुराणे व न्यायग्रंथ यांचाहि त्यांनी अभ्यास केला व बौद्धांचे धर्मग्रंथ उपलब्ध करून दिले. इंग्रजांनीहि या दिशेने मोठे कार्य केले पण जर्मनांनी केलेले कार्य सर्वश्रेष्ठ होते. भांडारकर सांगतात, " निरीक्षणात येणाऱ्या घटनांकडे तुलनेने व चिकित्सकतेने पाहण्याच्या त्यांच्या वृत्तीत, विचाराचा व भाषेचा क्रमशः विकास कसा झाला हे शोधण्याच्या प्रयत्नात व घटनांचा कालानुक्रम निश्चित करण्यात त्यांची अप्रतिम विद्वत्ता सामावलेली आहे. " भारतीयांच्या अशास्त्रीय पारंपारिक दृष्टिकोनावर भांडारकरांनी टीका केली. त्याचबरोबर युरोपीय विद्वत्तेची मर्यादा दाखविण्यासहि ते चुकले नाहीत. विशेषतः एखादा ग्रंथ, विचार वा संस्था यांचे अतिप्राचीनत्व अमान्य करण्याच्या त्यांच्या ठाम धारणेबद्दल आणि आपल्या वाङ्मयावर जेथे तेथे ग्रीक प्रभाव शोधण्याच्या वृत्तीबद्दल भांडारकर युरोपीय विद्वानांवर असंतुष्ट होते.

भांडारकरांच्या मते, भारतीय व पाश्चात्य विद्वानांतील निकट संपर्कानेच या दोन दृष्टिकोनांतील हे अंतर नाहीसे होणे शक्य होते. या परिषदेत त्यांना स्वतः पाहिलेल्या विश्वबंधुत्वाच्या भावनेनेच एका संस्कृत श्लोकात आपले विचार वृत्तबद्ध करण्यास प्रवृत्त केले.

> आपल्यापेक्षा पूर्णपणे भिन्न असलेल्या पौर्वात्यांची भाषा, शास्त्रे व कला यांच्या अभ्यासाचे सतत प्रयत्न करण्याची या लोकांना जिच्यामुळे प्रेरणा मिळते, ती मनुष्यजातीविषयीची बंधुत्वाची भावना सर्वोच्च म्हटली पाहिजे ...... वेगवेगळ्या देशांना मैत्रीच्या धाग्यांनी एकत्र आणण्यासाठी, युद्धे थांबविण्यासाठी व मानव जातीच्या उत्कर्षासाठी, अशासारख्या असंख्य परिषदा भरोत.

**थोरपणाची स्मारके**

शाश्वत स्मारक उभारण्याचे दोन प्रचलित मार्ग आहेत. एक म्हणजे त्या व्यक्तीने अंगिकारलेली तत्त्वे जतन करण्यासाठी व त्यांचा प्रचार करण्यासाठी एखादी संस्था स्थापन करणे व दुसरा मार्ग म्हणजे गौरव-ग्रंथ प्रकाशित करणे. भांडारकरांच्या वाटयाला ही दोन्ही भाग्ये आली. दोन्ही स्मारके प्रत्यक्षात आपल्या हयातीतच त्यांना पाहायला मिळाली. त्यांचे मित्र, विद्यार्थी व चाहते यांच्या प्रयत्नांनी १९१७ मध्ये 'भांडार-कर ओरिएंटल रिसर्च इस्न्टिटयूट' (भांडारकर प्राच्यविद्यासंशोधन संस्था) स्थापन झाली. तिच्या स्थापनेमागे "तिच्या सभासदांमध्ये आपल्या देशाच्या वाङमयीन, सामाजिक व राजकीय इतिहासाचा शोध घेण्याच्या वृत्तीला उत्तेजन मिळावे व तसा व्यासंग करणाऱ्या बाहेरच्या लोकांनाहि सोयी उपलब्ध करून द्याव्यात" हा हेतू होता. या तत्त्वांशी एकनिष्ठ राहून ही संस्था प्रचंड कामगिरी पार पाडीत आहे : महाभारताच्या चिकित्सक आवृत्तीचे प्रकाशन व 'दि ऑल इंडिया ओरिएंटल कॉन्फरन्स'-च्या (अखिल भारतीय प्राच्यविद्यापरिषद) बैठकी आयोजित करणे. ही परिषद एक वर्षाआड भरविली जाते. प्राचीन भारतीय विद्यांच्या वेग-वेगळ्या बाजूंवर संशोधनपर निबंध वाचले व चर्चिले जातात आणि पुढे ते प्रकाशितहि केले जातात. या परिषदेत बोलताना एकदा भांडारकरांनी भारतातील प्राच्यविद्याभ्यासाच्या प्रगतीबद्दल संतोष व्यक्त केला आहे. "आपल्यात चिकित्सक विद्वत्तेची वाढ होत आहे हे पाहून मला आनंद वाटतो. चांगली पुस्तके व व्याख्याने नुकतीच प्रकाशित केली गेली आहेत. आपल्यात चिकित्सक विद्वत्ता निर्माण झाली आहे व आपल्यावरील आक्षेपांविरुद्ध व हल्ल्यांविरुद्ध ती स्वतःचा बचाव करील असा विश्वास बाळगून मी माझ्या आयुष्यातील कर्तृत्वपूर्ण वर्षांची सांगता करतो. आज आपण सुरू करीत असलेल्या बैठकीत फार मोठ्या संख्येने संशोधनपर निबंध वाचले जाणार आहेत याचा मला फार आनंद वाटतो. त्यातले बरेचसे महत्त्वाचे असतीलच; तेव्हा आपणांस स्वतःचे अभिनंदन करून

घेण्यास सर्वतोपरी जागा आहे. ही परिषद आपल्या अभ्यासाच्या प्रगतीत महत्त्वाचा टप्पा ठरेल असा माझा विश्वास आहे. ”

वयाची ऐंशी वर्षे पूर्ण झाल्याच्या निमित्ताने, आदराचे व प्रेमाचे प्रतीक म्हणून, वेगवेगळया देशांतील विद्वानांनी लिहिलेल्या निबंधांचा एक गौरवग्रंथ त्यांना अर्पण करण्यात आला, या ग्रंथात वेद व प्राचीन वस्तू, महाकाव्ये व पुराणे, पाली, बौद्ध धर्म व जैन धर्म, तत्त्वज्ञान, इतिहास व पुरातत्त्व, व्याकरण व भाषाशास्त्र, काव्य व अलंकार आणि तांत्रिक शास्त्रे अशा, पौर्वात्य संशोधनाच्या विविध अंगांवरील लेखांचा समावेश आहे. मॅकडोनेल्, स्टेन, कीथ, टिळक, लेव्ही, पार्जिटर, ग्रिअर्सन, ऱ्हिस डेव्हिड्स्, गंगानाथ झा, बेलवलकर, देवदत्त रामकृष्ण भांडारकर, हरप्रसाद शास्त्री, स्मिथ व कृष्णस्वामी अय्यंगार इत्यादी लोकांनी यात लेख लिहिले आहेत. अखिल जगातले प्राचीन भारतीय विद्यातज्ञ भांडारकरांना बहुमान देत असत असे यावरून दिसून येते. भांडारकरांचे एक विद्यार्थी डॉ. गुणे हे एकदा अध्ययन-सफरीवर युरोपात गेले होते. त्यांनी सांगितले की भांडारकरांचे लेखन अधिकृत म्हणून अनेकदा उद्धृत केले जात असे आणि प्राचीन भारतीय विद्यांच्या विविध प्रश्नांवरील त्यांची मते हा अखेरचा शब्द मानला जात असे. प्रा. किलहॉर्न यांनी म्हटल्याप्रमाणे ‘ आधुनिक काळात भारतात जन्माला आलेल्या सर्वश्रेष्ठ संस्कृत पंडितांपैकी ते एक होत. ’

आपल्या युरोपीय मित्रांशी भांडारकरांनी सतत संबंध राखला होता. वायुपुराणाच्या भाषांतराच्या संदर्भात प्रा. मॅक्स मुल्लर त्यांना लिहीत असत, भांडारकरांनी हे काम अंगावर घ्यावे अशी त्यांची फार इच्छा होती, पण दुर्दैवाने भांडारकरांना ते शक्य झाले नाही. डॉ. बुह्लर त्यांना जुन्या हस्तलिखितांसंबंधी लिहीत, तर ऱ्हस डेव्हिड्स् यांनी बौद्ध धर्म व पाली वाङमय यावरील समस्यांसंबंधी लिहिले होते. यातून पाश्चात्य व भारतीय विद्वानांत असलेले निकट साहचर्य व जाण तर व्यक्त होतातच, शिवाय त्यांना भांडारकरांच्या विद्वत्तेबद्दल असलेला नितांत आदरहि यातून

दिसून येतो. गेल्डनर या जर्मन विद्वानाने त्यांना लिहिलेल्या पुढील पत्रातूनहि याचे प्रत्यंतर येईल.

स्वास्ति ! बेर्लिनाख्य राजधानि निवासी गेल्डनर नामक उपाध्याय: पुण्याख्यपत्तने श्रीभांडारकराचार्यं विद्यावृद्धं सर्वशास्त्रभांडागारं प्रणम्य सविनयं विज्ञापयति । श्री बूलेर भट्टेनाममृत्युरूप कालदष्टेन समस्तशास्त्र-संग्रहे Grundriss der Indo–Arischen Philologie इत्युक्ते श्रुतिलक्षणस्य सरहस्यमंत्र ब्राह्मणकलापस्य प्रपंचने नियुक्तोऽस्मि । अत्र स्वाध्यायविषये शाकलशाखा पाठांतररहिता श्रूयत आहो स्विच्छोजिपरं-पराप्राप्तानि पाठांतराणि करनिचित्क्वचित्तछ्यूत इतिचिंत्यते । भवत: प्रमाणं नापम् । वेदतत्त्वपारंतितीर्षु: । अतएव यावच्छक्यं यथावसरं वा भवंत उत्तरप्रसादं कर्तुमर्हंतीति मे सविनयाविज्ञाप्ति: सदा भवदादेश-वर्त्तिन: ।।[१]

**भद्रं नो अपि वात य**

**मना दत्तमुत ऋतुम । भद्रं व: ।।**

इ. स. १९२३ मध्ये, म्हणजे भांडारकरांच्या मृत्यूपूर्वी साधारण दोन वर्षे, रवीन्द्रनाथ टागोर व फ्रेंच विद्वान सिलव्हँ लेव्ही यांनी, संगमाश्रम

---

१. वरील पत्राचा सारांश असा :—

बर्लिन या राजधानीच्या शहराचा रहिवासी गेल्डनर नावाचा एक शिक्षक, आपल्या व्यासंगामुळे आदरणीय असलेल्या व सर्व शास्त्रांचा ठेवाच असलेल्या पुण्याच्या श्री. भांडारकरांपुढे आदरभावाने नतमस्तक होतो. ‘ Grundiss der Indo-Arischen Philologie ’ चे मी संपादन करीत आहे. समग्र वैदिक वाङ्मयावर आधारलेला हा ग्रंथ बुह्लर यांच्या अकाली निधनामुळे पुरा होऊ शकला नाही. या संदर्भात असे समजले की ‘ शाकलशाखा ’ ( वेदामधील ) चे पाठभेद नाहीत. आणि माझ्या समजुतीप्रमाणे यांपैकी काही पाठभेद काही ठिकाणी परंपरेने जतन केलेले आहेत. माझ्यापेक्षा आपणच यासंबंधी अधिक चांगल्या रीतीने सांगू शकाल, मला वेदांचा खरा पाठ समजून घ्यायचा आहे. म्हणून लवकरात लवकर आपल्याला सोयीचे असेल तेव्हा आपण शक्य तितक्या मुद्द्यांवर यासंबंधी प्रकाश टाकावा अशी मी आपल्याला नम्र विनंती करतो. आपला अज्ञाधारक के. एफ्. गेल्डनर.

या पुण्यातील निवासस्थानी त्यांची बऱ्याचदा भेट घेतली. १८७४ मध्ये भांडारकरांना लंडनच्या 'रॉयल एशियाटिक सोसायटीचे' सभासद करून घेण्यात आले; १८८७ मध्ये जर्मन ओरिएंटल सोसायटी, अमेरिकन ओरिएंटल सोसायटी आणि 'एशियाटिक सोसायटी ऑफ इटली' यांचे; व १८८७ मध्ये 'इम्पीरिअल अकॅडमि ऑफ सायन्स, सेंट पीटरबर्ग'चे; ते सभासद झाले. १८९५ मध्ये 'फॉरिन मेंबर ऑफ दि फ्रेंच इंस्टिट्यूट १८८५ मध्ये 'ऑनररी डी. फिल्, गॉटिन्जेन युनिव्हर्सिटी'; १८९१ मध्ये सी. आय्. ई.; १९०४ मध्ये मुंबई विद्यापीठाचे ऑनररी एल्. एल् डी.; १९०८ मध्ये कलकत्ता विद्यापीठाचे पीएच्. डी.; १९०३–०४ मध्य गव्हर्नर जनरलच्या विधिमंडळाचे सभासद; १९०४–०५ मध्ये मुंबई विधिमंडळाचे सभासद; आणि १९११ मध्ये ते के. सी. आय्. ई. झाले.

पौर्वात्य विद्यांतील त्यांच्या स्वतःच्या संशोधनामुळेच इतिहासात कायमचे स्थान मिळविण्याचा अधिकार भांडारकरांना प्राप्त झाला आहे. "चिकित्सक विद्वत्ता, गाढा व्यासंग, तटस्थ मतनिर्णय व स्वतंत्र बाणा हे गुण त्यांच्यात लक्षणीयरीत्या एकवटलेले होते. आपल्या पुस्तकांतून व संशोधनपर लेखांतून त्यांनी आपल्या व्यासंगाची चिरस्थायी स्मरणचिन्हे ठेवली आहेत, ती विद्वानांच्या भावी पिढ्यांना आदर्शवत् ठरतील. संस्कृत व तिच्याशी संबंधित भाषांच्या अभ्यासासाठी पाश्चात्य पद्धतींचा अवलंब करणारे ते पहिलेच. त्यांच्या लेखनात पौर्वात्य व पाश्चात्य यांचा उत्कृष्ट मिलाफ झालेला दिसतो. या दुर्मिळ अशा संयोगामुळेच त्यांना जागतिक कीर्ति मिळवता आली व आयुष्याच्या उत्तरार्धात 'प्राचीन भारतीय विद्यातज्ञांचे कपि' म्हणून ते यथार्थपणे ओळखले जाऊ लागले."[1]

१. मुंबईच्या 'रॉयल एशियाटिक सोसायटी'ने त्यांच्या स्मृतीला वाहिलेल्या श्रद्धांजलीतून उद्धृत; कर्नाटकी, 'डॉ. भांडारकर यांचे चरित्र', पृ. ४३५.

## ६. समाजसुधारक

एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात सुरू झालेल्या पाश्चात्य शिक्षणाचा भारतावर फार मोठा परिणाम झाला. या शिक्षणामुळे आपल्या सवयी, चालीरीती व संस्था चिकित्सकपणे पारखून घेणे आपल्याला शक्य झाले. त्यांचे दुरुपयोग व दोष आपण उघडे करू शकलो. या विचारांतून प्रेरणा घेऊन अगदी मूठभर भारतीय पुढारी हिंदू समाजाच्या परिस्थितीत सुधारणा घडवून आणण्याच्या आस्थेने पुढे आले. बिनीच्या समाजसुधारकांत राजा राममोहन रॉय, ईश्वरचंद्र विद्यासागर, आचार्य बाळशास्त्री जांभेकर आणि विष्णुशास्त्री पंडित हे होते. यांचे उदाहरण पुढे ठेवून आपल्याला शक्य तेवढी भर टाकण्याचे भांडारकरांनीहि ठरविले. लोकांच्या उत्कर्षासाठी कार्य करण्याची उत्कट इच्छा बाळगून महाराष्ट्रातील समाजसुधारणेच्या कार्याला त्यांनी हातभार लावला. सामाजिक परिषदा व सुधारणावादी मंडळामधून त्यांनी केलेल्या भाषणांनी या चळवळीची ध्येयनिष्ठ व आदर्श पार्श्वभूमि तयार केली. स्वतः इतिहासतज्ञ असल्यामुळे आपल्या सामाजिक चालीरीतींच्या चिकित्सक व ऐतिहासिक अभ्यासाने त्यांनी आपल्या कार्याची सुरुवात केली. श्री. सी. वाय्. चिंतामणी यांनी संपादित व प्रकाशित केलेल्या 'इंडियन सोशल रिफॉर्म'मध्ये १९०१ साली लिहिलेला '**दि सोशल हिस्टरी ऑफ इंडिया**' (भारताचा सामाजिक इतिहास) हा लेख म्हणजे भांडारकरांचा या बाबतीतला पहिला प्रयत्न होय.

हिंदूमधील जातिसंस्थेच्या विकासावरील एका छोटया टिपणाने या लेखाची सुरुवात केली आहे. मुळात ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य असे तीनच वर्ण अस्तित्वात होते आणि आपल्या परिस्थितीला अनुकूल ठरेल असा कोणताहि वर्ण स्वीकारण्याचे प्रत्येकाला स्वातंत्र्य होते. जाति शब्दाच्या हल्लीच्या आधुनिक अर्थाने या वर्णांना जाती म्हणता आले नसते. कालांतराने हे वर्ण अनुवंशिक बनले व ज्या वर्गात आपला जन्म झालेला नाही

तो वर्ण स्वीकारण्याची मुभा कोणालाहि उरली नाही. भारतात जाति-संस्था इतकी दृढ करणाऱ्या विशिष्ट कारणांचा भांडारकरांनी पुढीलप्रमाणे विचार केला. "या जातिसंस्थेचे बीज" काही महत्त्वाच्या पाश्चात्य मानववंशांत होते व तिकडे "ग्रीक, जर्मन व रशियन लोकांत आंतर्जातीय विवाहांवर व एकत्र खाण्यापिण्यावर निर्बंध होते" हे त्यांनी दाखवून दिले. तिकडे जरी या निर्बंधांची परिणती दृढ अशा जातिसंस्थेत झाली नाही तरी भारतात त्यांना 'अनुकूल भूमि' मिळाली. 'पश्चिमेत उत्कट राजकीय व राष्ट्रीयत्वाच्या भावनेची वाढ (जाति) बंधने शिथिल करण्यास सतत कारणीभूत झाली व अखेर ती जातिबंधने नामशेष करण्यात यशस्वी झाली.' पण भारतातील 'या भावनांचा अभाव' तेथील जातिबंधनांवर आधारलेली पद्धत चिरस्थायी होण्यास कारणीभूत झाला. एम. सेना या फ्रेंच विद्वानाच्या मतांशी भांडारकर सहमत होते. मात्र आज दिसणाऱ्या अनेक जाती अतिशय प्राचीन काळी म्हणजे अगदी वेदपूर्व काळातहि अस्तित्वात होत्या, सेनाच्या या प्रतिपादनाशी भांडारकरांचा मतभेद आहे. आधुनिक जाती जुन्या वर्णांपासून किंवा वर्गांपासून निर्माण झाल्या आहेत हेहि त्यांना मान्य नाही आणि 'पूर्वीच्या छोटयाछोटया नियंत्रणांचेच कालांतराने कडक निर्बंधांत रूपांतर झाले व हालचालीला कुठे जागाच उरली नाही,' या ओल्डनबर्जच्या म्हणण्याशी भांडारकर सहमत आहेत.

ब्राह्मणांचे वर्चस्व नाकारून जातिसंस्थेचा कडकपणा सौम्य करणे व सर्व जातींच्या लोकांना आपल्या धर्मात सामावून घेणे या बुद्धाच्या कामगिरीचे महत्त्व मानतानाच 'सामाजिक संबंधांच्या बाबतीत जातीयतेकडे दुर्लक्ष करणे हे आपले कर्तव्य आहे,' असे आपल्या अनुयायांच्या मनावर त्याने ठसविले नाही आणि इथेच प्रत्यक्ष कार्य करण्यात तो अपयशी ठरला असे भांडारकरांना वाटले. मध्ययुगातील भक्तिमार्गी संतांनीहि जातिसंस्थेला 'सामाजिक दोष' मानले नाही. फक्त 'ज्या परमेश्वरावर त्यांचे प्रेम होते त्याचे एकनिष्ठ भक्त म्हणून एकमेकांशी असलेल्या संबंधांत त्यांनी जातिभेद नाकारले!' या दोषाचे निराकरण करण्यासाठी

भांडारकरांनी सामाजिक व राजकीय क्रांतीची उत्कट साद घातली. हिंदुस्थानात पुष्कळ वेळा 'धर्मक्रांति' झाली, पण देशात 'सामाजिक व राजकीय क्रांति' होऊ नये याबद्दल त्यांना दु:ख वाटत होते.

त्यांनी सांगितलेली जातींची वैशिष्टये अशी आहेत–सजातीय विवाह[१], विशिष्ट गटातच रोटीव्यवहार[२] व लग्नसंबंध[३]. नवीन जाती तयार होण्याची इतर कारणे त्यांनी दिली आहेत ती अशी :– भौगोलिक अंतर, वंशसातत्य, जाति-बहिष्कार, 'श्रेणी' किंवा व्यापारीसंघांची स्थापना आणि धार्मिक प्रणाली अथवा पंथ. कालांतराने या कारणांमुळे जातींच्या संख्येत वाढ होत होत आज हिंदू समाज तीन हजारांहून अधिक जातींत विभागला गेला आहे. प्रत्येक जात हा एक स्वयंपूर्ण समाज आहे आणि त्याच्या विशिष्ट सवयी व आवडीनिवडी तयार झाल्या आहेत. यामुळे तो समाज इतरांपासून आणखीनच वेगळा होतो व सामाजिक देवाणघेवाण अधिकच अशक्य होते. हिंदू समाज ही केवळ एक भौगोलिक संज्ञा आहे. या पद्धतीचे सामाजिक, धार्मिक व राजकीय परिस्थितीवर होणारे दुष्परिणाम सांगावे तेवढे थोडेच !

आपल्या सुरवातीच्या काळात रावबहाद्दूर दादोबा पांडुरंगांनी जातिसंस्थेच्या दोषांचे निर्मूलन करण्याची गरज आपल्या शिष्यांच्या मनावर ठसविली होती त्याची भांडारकरांना या ठिकाणी आठवण होते. या उद्दिष्टासाठी रावबहाद्दुरांनी 'परमहंस सभा' नावाच्या संस्थेची स्थापना केली. एखाद्या नव्या सभासदाला प्रवेश देताना प्रथम त्याला एक प्रार्थना म्हणावी लागे व त्यानंतर भारतीय ख्रिस्त्यांनी शेकलेल्या पावाचा तुकडा खावा लागे. त्याने जातीयतेचा त्याग केल्याची ती खूण होती. या संस्थेची पहिली ओळख भांडारकरांना त्यांच्या एका मित्राने करून दिली. संस्थेचे उद्दिष्ट त्यांना बौद्धिक दृष्टया पटलेले असले तरी १८५३ मध्ये जेव्हा ते

---

१. एखाद्या गटाच्या मर्यादेबाहेर न जाता अंतर्गतच विवाह.

२. सहभोजन

३. विवाह

शिक्षणासाठी मुंबईला गेले तेव्हाच औपचारिकरीत्या संस्थेचे सभासद म्हणून त्यांनी आपले नाव नोंदविले. या वेळी अवघ्या सोळा वर्षांच्या भांडारकरांची या प्रसंगाची आठवण अशी होती :–

> दुमेटयांच्या चाळीतील एका खोलीत माझा प्रवेशसमारंभ झाला. मला एक पावाचा तुकडा खावा लागला आणि आपण काहीतरी भयंकर करतो आहोत अशा अस्पष्टशा भावनेने माझ्या अंगावर शहारे आले.[१]

या संस्थेचे कार्य अशा प्रकारे जवळजवळ एकोणिसाव्या शतकाच्या साठीच्या पूर्वार्धापर्यंत चालू राहिले. या वेळी सभासदांची नावे लिहिलेले पुस्तक चोरीला गेले व आपण जातीय छळाला बळी पडू अशी भीति प्रत्येकाच्या मनात उद्भवली. अशा तऱ्हेने ही संस्था मोडली व आता धर्मसुधारणेद्वारे जातीयतेचा प्रश्न हाताळणे येवढाच एक मार्ग उरला. परमहंस सभेच्या सभासदांचे असे मत पडले की धर्म-सुधारणेशिवाय समाज-सुधारणेला भक्कम पाया मिळणार नाही. म्हणून कलकत्त्याच्या ब्रह्मसमाजाच्या धर्तीवर प्रार्थना समाज या एकेश्वरी पंथाची स्थापना झाली. परमेश्वराचे पितृत्व व माणसामाणसांतला बंधुभाव ही याची तत्त्वे. या दुसऱ्या तत्त्वात जातिभेदांचे उच्चाटन अभिप्रेत होते. सर्व सामाजिक भेद समपातळीवर आणण्यालाहि याचा पाठिंबा होता. पंथाचे अनेक सभासद या गोष्टीला तयार नव्हते. तरीसुद्धा पूर्वीच्या सुधारकांपेक्षा या पंथाच्या सुधारकांचा दृष्टिकोण जातीयतेबाबत अधिक प्रतिकूल होता हे मात्र कबूल केले पाहिजे. सामाजिक सुधारणेसाठी सर्वतऱ्हेचे प्रयत्न या संस्थेने केले.

अनेक भारतीयांचा अप्रामाणिकपणा पाहून भांडारकर अस्वस्थ होत. ते म्हणतात, " आपल्याला सोयीचे असेल तेव्हा आपण जातीयता मोडतो व गरज संपली की पुन्हा तिचा स्वीकार करतो. " जातीयतेची भावना नष्ट होण्यासाठी व विभिन्न जातींतील रोटीबेटीव्यवहाराला उत्तेजन

१. ' कलेक्टेड वर्क्स् ', खंड २, पृ० ४८०.

मिळण्यासाठी हा खोटेपणा सोडून देण्याचा व सभांतून व परिषदांतून प्रामाणिक प्रयत्न करण्याचा उपदेश त्यांनी सुशिक्षित लोकांना केला. आंतर्जातीय विवाहात, सवयी, चालीरीती, आहाराच्या भिन्न तऱ्हा वगैरे फरकांची अडचण येईल याची जाणीव ही सूचना करताना भांडारकरांना नव्हती असे नाही, पण त्यांच्या मते हे प्रश्न दुय्यम व तात्पुरते होते.

हिंदू-मुस्लीम या दोन जातींत चांगला समंजसपणा प्रस्थापित व्हावा अशी, हिंदु-मुस्लीम ऐक्याचे एक प्रचारक म्हणून भांडारकरांची मनापासून इच्छा होती. हिंदूमधील जातिभेद नष्ट करणे ही, त्यांच्या दृष्टीने भारतातील ऐक्याच्या दृष्टीने एक आवश्यक बाब होती. त्यांनी आपल्या देशवासियांना आवाहन केले की " संघटित देश कसा तयार करता येईल हे जो कोणी मला समजावून देईल त्याचा मी अतिशय ऋणी राहीन. सध्या जगात चाललेल्या संघर्षात आपल्या देशाच्या भवितव्याची आपल्याला जर काही काळजी असेल तर या समाजांमध्ये एकत्वाची भावना निर्माण करण्यासाठी व वैरभावाचे कृतिशील सहानुभूतीत रूपांतर करण्यासाठी ताबडतोब काहीतरी करायला हवे आहे. "

भांडारकरांचे लक्ष गुंतविणारे जे आणखीहि सामाजिक प्रश्न होते त्यांतील सर्वांत निकडीचा प्रश्न म्हणजे भारतीय स्त्रियांची स्थिती. त्यांच्या शिक्षणाविषयी भांडारकरांना विशेष आस्था होती. देशाच्या बौद्धिक, नैतिक व आध्यात्मिक साधनांचा निम्मा भाग वाया जात आहे याची त्यांना अतिशय हळहळ वाटत होती. देशाच्या पुनरुत्थानात स्त्रियांचा फार महत्त्वाचा वाटा असल्यामुळे त्यांना योग्य शिक्षण मिळालेच पाहिजे, देशाची सर्वसाधारण परिस्थिती सुधारण्यासाठी त्यांचे शिक्षण आवश्यक आहे, देशी भाषांचा व इंग्रजी वाङमयाचा अभ्यास त्यांना फायद्याचा ठरेल अशी भांडारकरांनी शिफारस केली. स्त्रियांच्या शिक्षणाची आपली आदर्श कल्पना पुरुषांच्या शिक्षणासारखीच असायला हवी का ? —असा जो प्रश्न साधारणत: विचारला जातो त्यातहि तथ्य असल्याचे भांडारकरांना जाणवत असे. विद्यापीठीय शिक्षणाचा तरुण पदवीदधरांवर जो

प्रचंड बोजा पडत होता त्याविरुद्ध होणाऱ्या कठोर तक्रारींकडेहि भांडारकरांनी लक्ष वेधले. स्त्रियांची प्रकृती अधिक नाजूक व त्यांच्यावर घरकामाचा बोजाहि मोठा असल्यामुळे त्यांच्या अभ्यासक्रमाचा भार हलका करण्याची भांडारकरांनी शिफारस केली. माध्यमिक शिक्षण संपल्यावर स्त्रियांच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास करतील असे अधिक निवडक विषय त्यांना शिकविले जावेत असे त्यांनी सुचविले.

समाजव्यवहाराने स्त्रियांवर लादलेली क्रूर व अन्याय्य दु:खे हा त्यांच्या बाबतीतला दुसरा प्रश्न. भांडारकर म्हणतात, " ज्या माणसात न्यायबुद्धि व दया या भावना जागृत झाल्या आहेत तो क्षणभरहि अशी गोष्ट सहन करणार नाही. जो समाज, पुरुषाला कितीहि वेळा विवाह करण्याची—वयाच्या साठाव्या वर्षांपर्यंतहि—सवलत देतो आणि सात-आठ वर्षांच्या कोवळ्या मुलीला मात्र एक नवरा मेल्यावर पुन्हा लग्न करण्यास कडक विरोध करतो, जेथे पन्नास-साठ वर्षांच्या पुरुषाला अकरा-बारा वर्षांच्या मुलीशी लग्न करण्याची मोकळीक आहे; पहिली बायको मरून पंधरा दिवस उलटले नाहीत तोच दुसरी बायको करणाऱ्या माणसाचा जेथे एका शब्दानेही धिक्कार होत नाही, असा समाज स्त्रीच्या आयुष्याला फारच कमी किंमत देतो व स्त्रियांना जनावरांच्या बरोबरीने आणून बसवित असतो; असा समाज विषम व कमकुवत अवस्थेत असून अधिक निरोगी परिस्थितीतील समाजांशी यशस्वीरित्या स्पर्धा करण्यास तो नालायक ठरतो." नवीन वसाहतवाल्यांच्या प्रभावाला या नैतिक अध:पातासाठी जबाबदार धरत असतानाच, मुली अनेक वर्षे अविवाहित राहिल्या की काहींचे पाऊल कधीतरी वाकडे पडत असे व यामुळे बालविवाहाची प्रथा पडली, असेहि ते दाखवून देतात. भांडारकरांच्या दृष्टीने लहान वयात होणारी मुलामुलींची लग्ने हा त्यांच्या निरोगी विकासातील प्रत्यक्ष अडथळा होता. कारण त्याचा परिणाम दोघांचीहि शक्ति कमी होण्यात व पुढे अशक्त संतति निपजण्यात होत असे. बालस्त्रीहत्येची चाल, बहुपत्नीत्व व बहुपतित्व या सामाजिक दोषांचाहि भांडारकरांनी निषेध केला.

प्राचीन काळी देशाच्या धार्मिक व सांस्कृतिक विकासाशी स्त्रियांचा कसा संबंध असे हे इतिहासातील दाखले देऊन त्यांनी दाखविले. आपल्या पंथाच्या प्रचारात बुद्धाला स्त्रियांचे पुष्कळ सहकार्य मिळाले होते. पूर्वी स्त्रियांना उच्च शिक्षणापासून वंचित ठेवले जात होते हे म्हणणे चुकीचे ठरेल. गार्गी वाचक्नेयी, सुलभा मैत्रेयी व वडवा प्रातिथेयी यांच्या उदाहरणांवरून उलट सिद्ध होते. भांडारकरांच्या मते स्त्रियांना वाळीत टाकणे किंवा त्यांना तुच्छ लेखणे या प्रथा, पुढील काळात पडल्या आणि मुसलमानांच्या वर्चस्वाखाली त्या पक्क्या झाल्या.

भांडारकर केवळ पढतपंडित नव्हते, तर व्यवहारज्ञानीहि होते. मुंबईतील स्त्रियांच्या शाळेचे ते स्वतः चिटणीस होते व पुण्यातील तशा प्रकारच्या संस्थांशीहि त्यांचा संबंध होता. प्रा. धोंडो केशव कर्व्यांनी स्थापन केलेल्या महिला विद्यापीठाचे ते कुलपति होते. १५ जन १९१९ च्या आपल्या भाषणात त्यांनी भारतीय स्त्रियांच्या अनेक समस्यांची चर्चा केली व देशाच्या उन्नतीसाठी इतिहासातील आपली भूमिका पुन्हा बजावण्याचे त्यांना आवाहन केले. स्त्रियांना उच्च शिक्षण मिळावे या मताचे ते पुरस्कर्ते होते. स्वतःच्या कुटुंबात आपल्या नातींना बी. ए. व एम्. ए. पर्यंतचे शिक्षण देऊन त्यांनी समाजापुढे उदाहरण घालून दिले. त्यांच्यापैकी एकीला तर जगन्नाथ शंकरशेठ शिष्यवृत्ति पटकाविण्याचे श्रेय मिळाले.

**संमतिवयाच्या विधेयकाचा वाद**

भांडारकरांखेरीज इतरहि अनेक भारतीय सुधारकांचे लक्ष भारतीय स्त्रियांच्या स्थितीकडे वेधले गेले. १८८४ पासून बालविवाहविरोधी चळवळ सुरू करणारे व कसोशीचे प्रयत्न करून लोकमताला उत्तेजन देणारे बी. एम्. मलबारी हे अशांपैकीच एक होत. १८९० साली कलकत्त्यात भरलेल्या 'दि ऑल इंडिया नॅशनल सोशल कॉन्फरन्स'च्या चौथ्या अधिवेशनात याबद्दलचा एक ठराव संमत करण्यात आला. १८९१ मध्ये लॉर्ड लॅन्सडाऊनच्या शासनाने संमतिवयाचा कायदा केला. सरकारला अशा बाबतीत हस्तक्षेप करण्याचा अधिकार नाही असे मानणाऱ्या

प्रतिगामी वर्गाकडून जोरदार प्रतिकार होत असतानाच या कायद्याने हे वय दहाचे बारा केले. भांडारकरांसारखा कळकळीचा समाज-कार्यकर्ता अशा वेळी अलिप्त राहील हे शक्यच नव्हते. त्यांनी 'अ नोट ऑन दि एज ऑफ मॅरेज अँड् इट्स् कॉन्समेशन अॅकॉर्डिंग टू हिंदू रिलीजिअस लॉ' ('हिंदुधर्मशास्त्रानुसार विवाहाचे वय व विवाहसंबंध यावरील टिपण') अशी एक पुस्तिका लिहिली. पूर्वीच्या काळी मुलींचे विवाह त्या वयात आल्यावर होत असत असे त्यांनी या लेखात दाखविले. धर्मशास्त्रातील एक प्रकरण व श्लोक उद्धृत करून भांडारकरांनी शेवटी म्हटले आहे की, "हिंदु-धर्मशास्त्राने ऋतुप्राप्तीनंतर विवाह होण्यास विरोध केलेला नाही, तर संमतीच दिलेली आहे; वैवाहिक संबंधाची पूर्णता मुलगी वयात आल्यानंतर तीन वर्षे पुढे ढकलण्याची हिंदु-धर्मशास्त्रात परवानगी आहे." हे करताना, "मुलगी सोळा वर्षांची होईपर्यंत ती सशक्त मुलाला जन्म देण्याच्या स्थितीत नसते." या हिंदु-वैद्यकशास्त्राच्या विचारांवर, या धर्मशास्त्राच्या लेखकांची दृष्टी होती.

प्रतिगामी मताचे उद्गाते टिळक यांनी ठासून उत्तर दिले की, "होम झाल्यावर मुलीच्या पहिल्या ऋतुप्राप्तीनंतर त्याच रात्री गर्भदान विधी करण्याबद्दल सर्वसामान्य नियम आहे. थेट सूत्रकालापासून आज कमीत-कमी २५०० वर्षे ही पद्धत रूढ आहे. शास्त्रच हवे असेल तर हा खरा मार्ग आहे. तो माना वा न माना, पण कृपा करून प्राचीन लेखकांचा विपर्यास करणारे लिखाण करू नका. त्यांच्यावर किंवा आपल्या धर्मावर जुलूम करण्याचा प्रयत्न करू नका. श्री. तेलंग, श्री. भांडारकर इत्यादींना आम्हांला हेच सांगायचे आहे. आपले वादकौशल्य दाखवायला त्यांना इतर अनेक जागा आहेत. पण धर्मशास्त्र हा त्यातला एक विषय नव्हे... तुम्हांला जर शास्त्रांचा अचूक अर्थ लावता येत नसेल तर निदान गप्प राहण्याचा तरी प्रयत्न करा."

आपल्या स्थानावर अविचल राहून भांडारकरांनी प्रत्युत्तर दिले :

> श्री. टिळक यांना वाटते की सध्याची आपली चाल देशाच्या सर्व भागांत प्रचलित आहे आणि ती फार प्राचीन काळापासून चालत आली आहे; यात कधीहि बदल झाले नव्हते वा झाले नाहीत; शास्त्रांनी केवळ यालाच मान्यता दिली आहे; आणि त्या चालीशी जुळावा, म्हणून एका जुन्या ग्रंथातील एक परिच्छेद, व्याकरण व औचित्य डावलून ते फिरवीत आहेत. वेदांमध्ये वाफेचे इंजिन व विद्युत् तारायंत्र बघणाऱ्यांच्या पंथातच ते बसतात."

ग्रंथांचा अर्थ लावण्याच्या सामाजिक वादविवादापुरता हा मतभेद मर्यादित नव्हता. पुण्याच्या सुधारकांनी कायदेमंडळाच्या बाजूने बहुमत गोळा करण्यासाठी एक सभा बोलावली. परंतु सभा सुरू होण्याआधीच तरुणांच्या एका गटाने क्रीडाभवनात आलेल्या सुधारकांवर हल्ला केला आणि सभामंडपाची मोडतोड केली. भांडारकरांसारख्या वयोवृद्ध माणसाचा जाहीर अपमान करण्यात आला, त्यांच्यावर दगडफेक झाली व जीव वाचवण्यासाठी त्यांना स्वतःला आत कोंडून घ्यावे लागले! त्यांच्या शिष्यांपैकी, गोपाळ गणेश आगरकर यांनी या दुर्दैवी घटनेचा वृत्तांत आपल्या 'सुधारक' नावाच्या वर्तमानपत्रात दिला व महाराष्ट्रातील प्रतिगामी पुढाऱ्यांवर झोड उठविली. या प्रसंगाबद्दलच्या भांडारकरांच्या भावना पुढील उद्गारांतून व्यक्त झाल्या.

> आणखी एक मुद्दा मांडतो म्हणजे माझे काम संपले. १८६४ सालापासून मी वाङ्मयीन वाद घालतो आहे. श्री. टिळक करीत आहेत तसे, इतक्या पद्धतशीरपणे, माझ्याशी असभ्य वर्तन करणारा प्रतिस्पर्धी मला आजवर कधी भेटला नव्हता. माझे काम अप्रिय व क्लेशकारकहि झाले आहे, आणि माझ्या मौनाचे भलते अर्थ होण्याची शक्यता नसती तर गप्प राहणेच मी अधिक पसंत केले असते.

याच प्रकारे स्त्रियांच्या पुनर्विवाहाच्या प्रश्नाबाबतहि पुन्हा भांडारकरांनी अधिकारी व्यक्तींची मते उद्धृत केली व ही पद्धत प्राचीन

काळापासून चालत आली आहे हे दाखविले. मात्र पुढील काळात ही चाल उपयोगातून गेली व मनूच्या वेळी ती केवळ बालविधवांपुरती मर्यादित राहिली. पुढे एका जैन ग्रंथकाराचा आधार घेऊन भांडारकरांनी असे प्रतिपादन केले की बाराव्या शतकाच्या आरंभाइतक्या जुन्या काळातहि विधवा-विवाह रूढ होता पण नंतरच्या काही वर्षांत तो प्रचारातून नाहीसा झाला. याहि बाबतीत पुन्हा भांडारकर केवळ उपदेश करून थांबले नाहीत. १८९१ साली त्यांनी आपली कन्या शांताबाई हिला श्री. पाणंदीकर यांच्याशी पुनर्विवाह करण्याची परवानगी दिली. त्याबद्दल त्यांना सारस्वत सभेने वाळीत टाकण्याचा प्रयत्न केला. मात्र खुद्द टिळकांनीसुद्धा केसरीच्या १२ मे १८९१ च्या अंकात त्यांचे अभिनंदन केले.

इ. स. १८३० साली कायद्याने बंद केलेल्या सतीच्या चालीचा उलेखहि ' ऋग्वेद संहिते 'त नसल्याचे दाखविण्याचा भांडारकरांनी प्रयत्न केला. अथर्ववेदावरून ही चाल प्रचलित असल्याचे जरी दिसत असले तरी पुढे ती बंद पडली. इतर वंशांच्या प्रभावातून छंदोबद्ध स्मृतिग्रंथ लिहिले गेले त्या सुमारास ती पुन्हा उदयाला आली.

**पंडिता रमाबाईंचे शारदा सदन**

भांडारकरांचा स्वभाव सरळ असल्यामुळे त्यांच्याकडे येऊन मदत मागणाऱ्या प्रत्येकाच्या प्रामाणिकपणावर त्यांचा विश्वास असे. यामुळे कधी कधी ते सुधारक व दुर्धारक गटांतील वादात सापडत. ख्रिस्ती धर्मांतर केलेल्या पंडिता रमाबाईंनी १८८९ मध्ये मुलींची शिक्षण संस्था व वसतिगृह मुंबईत सुरू केले. त्या शाळेचे–' शारदा सदन 'चे प्रकरण अशाच स्वरूपाचे होते. प्रतिगाम्यांचा गट या संस्थेकडे संशयाने पाहणारा तर रानडे व भांडारकरांचे नेतत्व स्वीकारणाऱ्या सुधारक पंथाला अशा एका संस्थेने उपलब्ध करून दिलेले (ती एका ख्रिस्ती स्त्रीने चालविलेली असली तरी) शैक्षणिक फायदे करून घेण्यात काहीच गैर दिसत नव्हते. प्रतिगामी गटाचे पुढारी लोकमान्य टिळक यांनी आपल्या ' केसरी 'तून याविरुद्ध अनेक लेख लिहिले व निर्विवाद पुरावे गोळा करून अशा

संस्थेचा हेतू फारसा, स्त्रियांना शिक्षण देण्याचा नसून, हिंदू मुलींत ख्रिस्ती धर्माचा प्रसार करण्याचा आहे असे सिद्ध केले. त्यांनी ' शारदा सदन 'ला पाठिंबा देणाऱ्या समाज सुधारकांचा, हिंदुधर्माचे द्रोही म्हणून निषेध केला. याचा परिणाम असा झाला की रानडे व भांडारकर यांचीहि या संस्थेच्या गुप्त हेतूबद्दल खात्री पटली व त्यांनी संस्थेशी असलेला आपला संबंध तोडून टाकला. भांडारकरांच्या रोजनिशीतील एका टिपणात (१ जुलै १८९९) त्यांची चीड फार चांगली व्यक्त झाली आहे.

> पंडिता रमाबाईंनी घेतलेल्या व बाप्तिस्मा दिलेल्या असंख्य लहान मुलींना अनाथ करणारा दुष्काळ......तो दुष्काळ आपल्या धर्मांतरितांची संख्या वाढावी म्हणून त्यांनी केलेल्या प्रार्थनेचे उत्तरच आहे असे मानून, प्रार्थनेचे तत्त्व त्यांनी फार पोरकट करून ठवले आहे. असेहि कळते की, मुले आजारी पडली तर त्या औषधहि देत नाहीत आणि त्याऐवजी त्यांना प्रार्थना करायला लावतात.

भांडारकर आपल्याला दुष्ट रूढी न पाळण्याचा इशारा देतात. त्यांनी लिहिले आहे, " इंग्रजी शिक्षणाने व युरोपीय संस्कृतीशी आलेल्या संबंधाने आपली मने स्वतंत्र झालेली असताना आपण अजून रूढींची पूजा करीत राहून त्यांचे गुलाम बनायचे का ? आपल्या नैतिक भावना मृतावस्थेत राहू द्यायचा की ? आणि अन्याय्य व क्रूर सामाजिक चालींची भरभराट होऊ द्यायच्या का ? नाही. प्रगतीशील पाश्चात्य मानवजातींशी आपला आता अतूट संबंध जडला आहे. त्यांच्या पावलाला पाऊल मिळवून आपल्याला चालले पाहिजे. आपल्या सामाजिक संस्था सुधारून त्या नीतिमान, विवेकी व न्याय्य झाल्या पाहिजेत. सामाजिक व नैतिक प्रगतीशिवाय राजकीय प्रगति होणे शक्य नाही असे माझे स्पष्ट मत आहे."

खालच्या जातींच्या परिस्थितीकडेहि भांडारकरांनी दुर्लक्ष केलेले नव्हते. त्यांच्या निराश व दुर्बळ परिस्थितीची व निरक्षरतेची त्यांना फार मोठी खंत होती. त्यांचा नुसता स्पर्शहि कसा किळसवाणा वाटत

असे याकडे त्यांनी लक्ष वेधले. आपले समाजातील स्थान सुधारावे म्हणून अनेकदा ते धर्मांतर करून ख्रिस्ती होत ही गोष्ट खेदाची होती. १९१२ मध्ये कनिष्ठ जातींच्या परिषदेच्या अध्यक्षीय भाषणात त्यांनी आपल्या कल्पना व्यक्त केल्या. १९०७–८ च्या मद्यपानविरोधी चळवळी-शीहि त्यांचा संबंध होता. तरुण लोकांनी परदेशप्रवास करावा म्हणून ते उत्तेजन देत. पूर्वीच्या काळी याला अजिबात निर्बंध नव्हता असे ते म्हणत. परदेशांत प्रवास करण्याने मनुष्य बरेच काही शिकतो व त्याचा दृष्टिकोण विशाल होतो असा त्यांचा विश्वास होता.

आपल्या लोकांचे बळ कमी करणाऱ्या आणि त्यांच्या शक्ति व सामर्थ्यांना पुरेसा वाव मिळू न देणाऱ्या दुष्ट रूढींचे निर्मूलन करणे हे सामाजिक सुधारणेच्या चळवळीचे उद्दिष्ट आहे असे भांडारकरांचे मत होते. सामाजिक बदल आपोआप घडू न देता विचार व नीतिमत्ता यांच्या मार्गदर्शनाखाली घडवून आणले पाहिजेत. सामाजिक घटनांमध्ये हात न घालण्यामुळे घडून आलेले बदल अतार्किक व अनैतिक असल्याची उदाहरणे आपल्या पूर्व इतिहासात अनेक आहेत असे भांडारकरांनी दाखवून दिले. "समाज-सुधारकाच्या मनात न्यायबुद्धीचा उदय व्हायला हवा, दुसऱ्यांच्या दुःखाविषयी गाढ सहानुभूति हवी, आपला देश व लोक यांच्याबद्दल प्रेम आणि भविष्यकाळातील कल्याणाची आस हवी" अशी भांडारकरांची समाज सुधारकाविषयीची व्याख्या आहे.

सामाजिक क्षेत्रात अविचाराने कृति करण्याच्या मताचे भांडारकर नव्हते. उलट सुधारणेच्या मूळ प्रेरणा आपल्या मनात जोरदार असाव्यात, परंतु भूतकालापासून चालत आलेल्या जीवनप्रवाहापासून आपल्याला अलग करणार नाहीत असे सौम्य रूप त्यांना कसे द्यावे हे भांडारकरांनी समजावून सांगितले. "फ्रेंच राज्यक्रांतीच्या पद्धतीचा अवलंब न करता ज्या इंग्रजांचे आपण अनुयायी, त्यांची कार्यपद्धती आपण स्वीकारली पाहिजे," म्हणूनच त्यांनी विचारले, "कॉबडेन व ब्राईट यांनी 'कॉर्न लॉज्' मध्ये सुधारणा घडवून आणण्यासाठी ज्याप्रमाणे तर्कशक्तीच्या मार्गदर्शनाने व

नियंत्रणाने आणि न्याय चिकित्सेच्या वृत्तीने, केवळ देशप्रेमाने प्रेरित होऊन काम केले, त्या पद्धतीने काम करणारे दृढनिश्चयी लोक आपल्या देशात आहेत का ? ”

सामाजिक घडामोडींच्या बाबतीत भांडारकर वाटेल ती तडजोड करण्याच्या विरुद्ध होते. समाजसुधारणेची चळवळ तार्किकता, सत्य व न्याय या तत्त्वांवर आधारलेली असली पाहिजे असे त्यांचे मत होते. त्या बाबतीत तडजोड करण्याचा प्रश्नच नव्हता. आपल्या सद्सद्विवेक-बुद्धीला जे योग्य वाटेल व आपल्या विचारशक्तीला जे पटेल ते आपण करायचे. परदेशप्रवास करण्यात आपण कोणतेहि पाप करीत नाही असे आपल्याला वाटत असेल तर वाळीत टाकले जाण्याच्या भीतीने समाजाच्या दबावाखाली नमून 'प्रायश्चित्त' घेण्याचे मुळीच कारण नाही. असल्या धमक्यांना धैर्याने व निर्भयपणे तोंड द्यावे असे ते सांगतात.

दुर्लक्षित प्रश्नांचा आवर्जून विचार करणाऱ्या भांडारकरांना आपल्या शेतकरी वर्गाच्या पिढ्यान्‌पिढ्या चालत आलेल्या दारिद्र्याबद्दल अतिशय कळकळ वाटत होती व सावकारांचा उपद्रव हा त्यांच्या दृष्टीने एक फार मोठा सामाजिक दोष होता. शेतकी बँका स्थापन करून कमी दराच्या व्याजाने शेतकऱ्यांना कर्ज देण्याची त्यांनी सूचना केली. “ सर्वत्र साव-कारांच्या लोभाला बळी पडणाऱ्या ” शेतकऱ्याच्या कल्याणाबाबत सरकार दाखवीत असलेली उदासीनता त्यांना अस्वस्थ करीत होती.

एकोणिसाव्या शतकातील उत्क्रांतीच्या तत्त्वाचा त्यांच्यावर फारच परिणाम झाला होता व त्यांना तो एक महान् शोध वाटत होता. त्यांच्या दृष्टीने त्याचा अर्थ असा : “ विश्वात सर्वत्र साध्याकडून समिश्राकडे, मृता-कडून सजीवाकडे असा लौकिक व आध्यात्मिक जगताचा विकास होत आला आहे. हाच ईश्वराचा नियम. वाईट व अविचारी गोष्टी बदलण्या-ऐवजी आपण विचारी व चांगल्या गोष्टींकडे जात राहिलो तर आपण विश्वाचा नियम पाळल्यासारखे व ईश्वराशी सहकार्य केल्यासारखे होईल. ”

या थोर समाजसुधारकाच्या अशा थोर विचारांमुळेच कदाचित चंदावरकरांना त्यांची गणना, राजा राममोहन रॉय, केशवचंद्र सेन, ईश्वरचंद्र विद्यासागर व विष्णुशास्त्री पंडित यांच्यासारख्या १९ व्या शतकातील नामांकित समाजसुधारकांत करावीशी वाटली.

समाजसुधारणा चळवळीने केलेल्या प्रगतीबद्दल भांडारकरांना समाधान वाटत होते. पुणे येथे १९१४ साली भरलेल्या 'प्रॉव्हिन्शिअल सोशल कॉन्फरन्सला ( प्रांतिक समाजपरिषद ) उद्देशून बोलताना ते शेवटी म्हणाले, " या पिढीत रूढींच्या दास्यातून वर येण्याचा निर्धार केलेली माणसे आहेत हे पाहून मला अतिशय आनंद होतो. समाजात आमूलाग्र बदल घडवून आणण्याचे व समाजाची अधिक सौम्य तत्त्वांवर पुनर्रचना करण्याच्या आणि देशाचे वैभव वाढवतील, त्याला सुखी करतील अशा सर्व बाबतींत निर्विघ्न प्रगतीचा मार्ग शोधण्याच्या अंतिम हेतूने स्पष्ट व अचूक पावले टाकण्याचे कार्य त्यांनी निर्भयपणे चालू ठेवले आहे."

# ७. धर्मसुधारक

भांडारकरांचे धर्मविषयक विचार प्रार्थनासमाजाच्या व्यासपीठावरून त्यांनी दिलेल्या प्रवचनांच्या ‘ धर्मपर लेख व व्याख्याने ’ या संग्रहातून आपल्याला कळतात. भारताच्या प्राचीन धर्मविचारांच्या अभ्यासात तर हे लेख महत्त्वाची भर टाकतातच, शिवाय तुकाराम, ज्ञानेश्वर, एकनाथ व नामदेव यांच्यासारख्या महाराष्ट्राच्या मध्ययुगीन संतांचा पुन्हा अभ्यास करून जुन्या मराठी वाङमयाचीहि मोठी सेवा या पुस्तकाने केली आहे. वाचकांना सत्य, प्रेम व जीवनातील दैवी सुसंवाद यांसाठी सतत झटण्याचे आवाहन यात आहे. श्री. नारायण गणेश चंदावरकर लिहितात, “ जीवनात संकटांच्या काळात या प्रवचनांनी आधार दिला आहे; दुःखाच्या क्षणी यांनी अंतर्मनातील आनंद जागृत केला आहे; व तुकाराम, नामदेव इत्यादि संतांच्या शाश्वत काव्यातील दैवी तेज यांनी प्रज्वलित केले आहे. ”[१]

भांडारकर कट्टर प्रार्थनासमाजी असल्यामुळे एकेश्वरी तत्त्वावर व माणसांतील बंधुभावावर त्यांचा विश्वास होता. पूजाअर्चेची प्रचलित पद्धत त्यांना अमान्य होती आणि मनाचे शुद्धीकरण व उन्नयन करण्याचा एकमेव मार्ग म्हणून प्रार्थनेवर त्यांची दृढ श्रद्धा होती. भांडारकरांच्या दृष्टीने या जीवनमार्गाचा आपल्या नित्यकर्मांशी कधीच संघर्ष आला नाही. म्हणूनच प्रार्थनासमाज ही पूर्णपणे धार्मिक संस्था असूनहि तिच्या सभासदांनी समाजसुधारणा चळवळीसाठी जोरदार प्रयत्न केले. भांडारकर व त्यांचे मित्र न्यायमूर्ती रानडे या दोघांचाहि विश्वास होता की देशाची राजकीय, सामाजिक, आर्थिक व धार्मिक प्रगति या गोष्टी एकमेकींवर अवलंबून असतात. “ हे परस्परावलंबित्व हा केवळ योगायोग नसून तो निसर्गाचा नियमच आहे. ”

---

१. श्री. चंदावरकरांच्या पुरस्कारातून.

समाज सुधारणेच्या कार्यक्रमाचा पाया म्हणून धार्मिक सुधारणा घडवून आणणे आणि खऱ्या ईश्वराच्या शुद्ध उपासनेची योजना करणे, या उद्देशाने प्रार्थना समाज स्थापन झाला. समाजाची पहिली बैठक, ३१ मार्च १८६९ रोजी, डॉ. आत्माराम पांडुरंग यांच्या घरी झाली. नारायण महादेव परमानंद, बाळ मंगेश वागळे, मोरोबा विनोबा, भास्कर हरी भागवत, वासुदेव बाबाजी नवरंगे व वामन आबाजी मोडक हे या संस्थेचे इतर काही महत्त्वाचे सभासद. पंथभेद व जातिभेदांच्या संकुचितपणापलीकडे गेलेल्या या अतिरथींनी, व्यक्तिगत विकासासाठी व देशाच्या प्रगतीसाठी सत्य व प्रेम या वृत्तींचे हृदयात अधिष्ठान हवे अशी शिकवण दिली. प्रार्थना समाजात येऊन लोकांच्या सामाजिक व धार्मिक कल्याणासाठी मनःपूर्वक कार्य करणाऱ्यांपैकी सर्वांत थोर म्हणजे न्यायमूर्ती रानडे व भांडारकर. त्यांच्या समर्थ मार्गदर्शनाखाली ब्राह्म समाजाच्या चुका प्रार्थना-समाजाने केल्या नाहीत. ज्या हिंदू समाजातून तो जन्माला आला त्याच्या-पासून स्वतःला तोडून वेगळा पंथ त्याने स्थापला नाही. ख्रिस्ती धर्माशी हातमिळवणी न करता त्याच्या एकेश्वरी तत्त्वाची जुन्या भागवत धर्माच्या व महाराष्ट्रातील संतांच्या एकेश्वरी तत्त्वाशी सांगड घालण्याचा त्याने प्रयत्न केला. धर्म ही केवळ भावनेची बाब नसून बौद्धिक बाबहि आहे असा या पंथाचा दृढ विश्वास होता.

'दि पोझिशन ऑफ प्रार्थना समाज इन दि रिलीजिअस वर्ल्ड[१]'—धार्मिक जगतातील प्रार्थनासमाजाचे स्थान—स्पष्ट करताना भांडारकर म्हणाले की, उपनिषदे, भगवद्‌गीता, बायबल आणि जगातील इतर धार्मिक वाङ्मयात येणारी धर्माची विश्वात्मक तत्त्वे प्रार्थनासमाजाने स्वीकारली आहेत. सगळे धर्म ईश्वराने निर्माण केले आहेत असे मानणारी प्रार्थनासमाज ही एकमेव संस्था होती. विभिन्न धर्मांमध्ये वैरभाव असणे ही आजवरची

---

१. इ. स. १९०३ मध्ये, पुण्याच्या प्रार्थना समाजाच्या ३२ व्या वर्धापनानिमित्त त्यांनी हे व्याख्यान दिले होते.

नित्याची बाब असतानाहि, सर्व धार्मिक श्रद्धांकडे सहानुभूतीच्या वृत्तीने पाहण्याच्या आवश्यकतेवर तिने भर दिला. भांडारकरांच्या मते, सर्व धर्मांच्या तुलनात्मक अभ्यासामुळे धार्मिक दृष्टिकोण स्वच्छ व स्पष्ट होऊन, प्रार्थनासमाजाचे सभासद धार्मिक बाबतींत स्वतंत्र मते बनवू शकले व सर्व धार्मिक द्वेषांचे निर्मूलन करू शकले.

सरसकट हिंदूधर्माच्या नावाखाली मोडणाऱ्या कुठल्याहि धर्माला चिकटून न राहण्याचा इशारा आपल्याला भांडारकर देतात. उपनिषदे व भगवद्गीतेतील सर्वोत्तम भागाचा आणि मध्ययुगीन संतांच्या शिकवणीचा स्वीकार करून बौद्धधर्म किंवा बायबलमधील काही विचारांची त्याला जोड देण्याची ते शिफारस करतात.

मूलत: एक विद्वान असल्यामुळे, 'ईश्वर स्वत:चा साक्षात्कार माणसाला कसा घडवितो हे शोधण्यासाठी, धर्मात महत्त्वाचे व आवश्यक काय आणि पूर्णपणे अनुषंगिक काय हे ठरविण्यासाठी आणि आपल्याला मानसिक व नैतिक दुबळेपणामुळे मनुष्य ज्या प्रमादात गुरफटला आहे त्यापासून, प्रत्यक्ष ईश्वराने माणसाला शिकविलेले सत्य वेगळे करण्यासाठी[1] ' धर्माचा अभ्यास करताना भांडारकर त्याच चिकित्सक व तौलनिक पद्धतीचा अवलंब करतात.

भांडारकरांच्या मते धर्म व मानवता या अविभाज्य गोष्टी आहेत आणि त्यामुळे धर्म हा एका विशिष्ट देशापुरता किंवा लोकांपुरता मर्यादित नसतो. जिच्यापासून सर्व दृश्य वस्तू निर्माण झाल्या आहेत, जी उपकारक असून तिच्यावर अवलंबून राहता येते आणि त्यामुळे जी भक्तीचा व पूजेचा विषय झालेली आहे अशा एका अदृश्य शक्तीवर माणूस नेहमीच विश्वास ठेवीत आला आहे. ईश्वर व परलोक या गोष्टी केवळ मिथ्या आहेत असे आपल्याला सांगणाऱ्या लोकांना भांडारकर विचारतात की भौतिक शास्त्रात आपल्या ज्ञानेंद्रियांच्या कक्षेत न येणाऱ्या गोष्टींवर आपण विश्वास ठेवीत नाही का ?

---

१. 'कलेक्टेड वर्क्स्', खंड २ पृष्ठ ६०४-५

मनुष्याच्या विकासात धार्मिक श्रद्धांचे कार्य भौतिक ज्ञानापेक्षा मोठे आहे. मनाची पवित्रता, भावनांची उदात्तता, व्यावहारिक परिणामांवर दृष्टी ठेवून सत्याला चिकटून राहणे आणि जीवनाच्या असंख्य दुःखांतहि मनाचा समतोलपणा ठेवणे यासारखे गुण केवळ धर्मच माणसात रुजवू शकतो.[१] माणसाच्या बुद्धीचा जेव्हा उदय झाला आणि वरचे आकाश व खालची पृथ्वी यांनी त्याचे कुतूहल जागृत केले; आपल्याला वेढणारे दृश्य अक्षरशः अमर्याद असल्याचे त्याच्या डोळ्यांनी पाहिले; जिचे कार्य आपल्यावर अवलंबून नाही आणि आपले सुख जिच्यावर अवलंबून आहे, अशी एक शक्ति आपल्याभोवती वावरत असल्याचे त्याला कळले; तेव्हा त्या उद्देशाने व अनंताने आपले अस्तित्व त्याला मानायला लावले, त्याची भक्ति व प्रेम जागृत केले आणि त्याच्यापुढे तो नतमस्तक झाला, त्याची पूजा करू लागला.[२]

एक विशिष्ट धर्मच देवाने निर्माण केला आहे असे म्हणणाऱ्यांना भांडारकरांनी उत्तर दिले आहे की माणसाने फक्त ख्रिस्ती धर्मच स्वीकारला आहे असे नाही. हिंदुधर्म, बौद्धधर्म, इस्लाम आणि इतरहि अनेक धर्म जगात भरभराटीस आले आहेत व येत आहेत. यापैकी कोणत्याहि एकाच धर्माचे असे काय विशेष अधिकार आहेत की त्यालाच फक्त साक्षात्कार म्हणावे ? सगळेच धर्म ईश्वराने निर्माण केले आहेत. पण आपल्या आकलन शक्तीच्या मूलभूत दुबळेपणामुळे आपल्या पित्याने शिकविलेल्या सत्यात माणसाने पुष्कळ खोट्या गोष्टी घुसडल्या आहेत. धर्म जर सर्वांत महत्वाचा असेल तर ईश्वराने तो मनुष्याच्या स्वभावातच रुजवून अगदी सुरवातीपासूनच त्याला तो दाखवला असता म्हणजे मनुष्य जेथे जाईल तेथे धर्माने त्याची सावलीसारखी सोबत केली असती. या साक्षात्काराच्या शेवटच्या अवस्थेचे मूर्त स्वरूप म्हणजे प्रार्थना समाजाची चळवळ असे भांडारकर मानतात.

---

१. 'कलेक्टेड वर्क्स्', खंड २, पृ० ६०६

२. 'कलेक्टेड वर्क्स्,' खंड २, पृ० ६०७

काही सार्वत्रिक तत्त्वांवर आधारित अशा एकात्मक धर्मपंथाच्या दृष्टीने योजना चालू ठेवण्यासाठी भांडारकरांनी व प्रार्थना समाजाने हरेक प्रयत्न करूनहि हे प्रकरण अल्पायुषी ठरले व बंगालच्या ब्राह्म समाजाप्रमाणे फार लौकर नामशेष झाले हे कबूल केले पाहिजे. ही बहुजनसमाजाची चळवळ होऊ शकली नाही कारण सुशिक्षित वर्गातल्याहि काही थोडचा लोकांपुरतीच ती मर्यादित होती.

धार्मिक बाबींकडे पाहण्याचा भांडारकरांचा दृष्टिकोण एखाद्या चिकित्सक विद्वानाचा होता. वेगवेगळे धर्म व त्यांचे महत्त्व यांच्या तुलनात्मक अभ्यासामुळे त्यांचा असा विश्वास बसला होता की 'भारतात ज्या चमत्कारिक व आश्चर्यकारक क्रांत्या झाल्या आहेत तशा जगातील दुसऱ्या कुठल्याहि देशात झाल्या नसतील आणि ईश्वराने आपल्या सत्याचा उलगडा, माणसाला हळूहळू ज्या पद्धतीने केला तिचा याहून अधिक स्पष्टपणे शोध ईश्वराच्या कुठल्याहि निष्ठावंत भक्तांनी घेतला नसेल.' 'बेसीस ऑफ थेइजम अँड इट्स् रिलेशन टू दि सो कॉल्ड रिव्हील्ड रिलीजन'[१] ('एकेश्वरी तत्त्वज्ञानाचा आधार व त्याचे तथाकथित साक्षात्कारी धर्माशी नाते') या आपल्या व्याख्यानात आपल्या धार्मिक इतिहासाने आपल्याला काय शिकविले हे ते दाखवितात.

प्राचीन आर्यांना निसर्गाच्या घटकांत प्रथम आपला ईश्वर सापडला असे त्यांचे मत होते. स्वर्ग व पृथ्वी यांचा निर्माता केवळ ईश्वरच होता. काही काळ कार्यरत राहिल्यावर मानवी चैतन्य सुप्त बनले. प्रेमळ वजिवंत भक्तीची जागा थंड व मृतवत् क्रियाकर्मांनी घेतली. प्राचीन ऋषींच्या तेजस्वी प्रार्थनांत ग्रंथित झालेल्या ऋचा व सूक्ते औपचारिक पूजेसाठी-यांत्रिकपणे, त्यांचा अर्थ समजून घेण्याचा प्रयत्नहि न करता वारंवार उच्चारली जाऊ लागली. देवतांचे सारे महत्त्व नष्ट झाले व कालांतराने

१. प्रार्थना समाजाच्या वर्धापनाच्या वेळी दिलेले व्याख्यान; मुळात १८८३ मध्ये प्रकाशित झालेले.

धर्माच्या या धर्मवेत्त्यांनी ईश्वराचे अस्तित्व नाकारून यज्ञातील क्रिया-कर्मांनी मनुष्यजातीचा उद्धार होईल असा प्रचार सुरू केला. ही परिस्थिती फार काळ टिकली नाही. उपनिषदे, सांख्य तत्त्वज्ञान व बौद्धधर्म यांनी तिला आव्हान दिले.

'यज्ञयाग म्हणजे निव्वळ बुडत्या बोटी' अशी घोषणा करून उपनिषदांनी विश्वाचा कर्ता, प्रभव व विश्वव्यापी, सर्वेश्वर, अज, अविकार्य व शुद्ध असा जो 'सर्वज्ञ आत्मा' त्याच्या चिंतनाचा आदेश दिला. आपल्या अंतःकरणात व इतर सर्वत्र 'त्याला' पाहणारा माणूस, मृत्यूच्या फेऱ्यातून सुटतो आणि त्याला चिरंतन सुखाचा लाभ होतो. केवळ सर्व दुःखांचे मूळ उपटून काढल्यानेच चिरंतन सुख मिळविता येते अशी घोषणा सांख्य तत्त्वज्ञांनी केली. आपल्या आत्म्याचा व 'प्रकृति' नामक अचेतन तत्त्वाचा संयोग होण्यावर हे अवलंबून आहे. हीच विचारप्रणाली पुढे बौद्धांनी उचलली. यज्ञकर्मे निष्फळ आहेत अशी घोषणा करून वेदांचा अधिकार त्यांनी नाकारला. त्यांच्या मते नीतिनियमांच्या कडक आचरणातून, वासनांवर ताबा मिळवून आणि मन शुद्ध व उदात्त बनवून अंतिम आनंद (निर्वाण) मिळतो. हा धर्म केवळ हिंदू समाजातील सर्व वर्गांसाठीच होता असे नव्हे तर तो सबंध जगासाठी होता. पण ईश्वराला नाकारणे, माणसाला मित्रापासून व रक्षणकर्त्यापासून वंचित ठेवणे हा या विचारसरणीचा फार मोठा दोष होता. कालांतराने फक्त गीताप्रणित भक्तितत्त्वच हा दोष दूर करू शकले. गीतेने माणसाला स्वतःऐवजी ईश्वरावर प्रेम करायला शिकविले; अंतिम श्रद्धा त्याच्यावर ठेवून आपल्याऐवजी त्याच्यासाठी जगायला शिकवले.

धर्म हा एका विशिष्ट वर्गासाठी नसून सर्वांसाठी आहे हा बौद्ध धर्माने प्रथम मांडलेला विचार भक्तिपंथाने उचलला. त्याचा मोक्षाचा मार्ग सर्वांना खुला होता. मध्ययुगीन संतांनी बेगडी धर्माचा निषेध केला, भक्तीचे तत्त्व पुन्हा प्रस्थापित केले आणि अंतःकरणाच्या शुद्धतेवर भर दिला. तुकारामाच्या एका अभंगात याचे उत्तम उदाहरण मिळते :–

" मी वैकुंठाचा रहिवासी आहे, आणि ऋषींनी दिलेली शिकवण प्रत्यक्ष आचरणात आणण्यासाठी जन्माला आलो आहे. संतांचे (त्यांनी तयार केलेले) मार्ग आम्ही झाडून स्वच्छ करू; जगात अमाप तण माजले आहे; आम्ही उच्छिष्टाचा भाग स्वीकारू. पुराणांच्या परिणामात सत्य लोपले आहे व शब्दज्ञानाने नाश केला आहे. मन विषयासक्त झाले आहे; आणि (ईश्वराकडे जाण्याचा) मार्ग उद्ध्वस्त झाला आहे. आम्ही भक्तीचा डांगोरा पिटून कळिकाळाचाहि थरकाप उडवू, तुका म्हणे, – या विजयाचा आनंदाने जयजयकार करूं. "[१]

भांडारकर म्हणतात, तुकारामाप्रमाणे प्राचीन ऋषींची शिकवण आचरणात आणण्यासाठी आपला उपयोग होऊ दे. स्वदेशी आणि परदेशी, आपल्याला उपलब्ध असलेल्या सर्व मार्गांनी शिकू या. संपूर्ण नम्रतेने जर आपण हे शिकलो व आपल्या मार्गदर्शकांचे निर्भयपणे व श्रद्धेने अनुकरण केले तर आपल्याला भविष्यकाळाची भीति वाटण्याचे काहीच कारण नाही. [२]

१. 'कलेक्टेड वर्क्स्', खंड २ पृ. ६१५
२. 'कलेक्टेड वर्क्स्', पृष्ठे ६१५-१६.

# ८. उपसंहार

दि. २४ ऑगस्ट १९२५ रोजी भांडारकरांचा मृत्यू झाला. बुद्धिमान, विद्वान व विख्यात शिक्षक, सुप्रसिद्ध शिक्षणतज्ज्ञ व जागतिक कीर्तीचे प्राचीन भारतीय विद्यातज्ज्ञ, समाजसुधारक व धर्मसुधारक अशा नात्यांनी त्यांनी आपल्या देशाची सेवा विविध मार्गांनी केली. ते दादाभाई व रानडे यांच्या उदारमतवादी पंथाचे होते. राजकीय प्रगतीपूर्वी देशात सामाजिक, धार्मिक व आर्थिक सुधारणा झाल्या पाहिजेत यावर त्यांचा विश्वास होता. सामाजिक-धार्मिक सुधारणांच्या क्षेत्रात पुढाकाराने कार्य करताना राजकारणात भाग घेण्यास भांडारकरांना वेळ मिळाला नाही. उलट टिळकपक्ष राजकीय सुधारणांच्या पक्षाचा होता आणि त्यांच्या दृष्टीने आपल्या देशातील समस्यांवर तोच एकमेव उपाय होता. विचारांतील या विरोधामुळे रानडे व आगरकरांप्रमाणे भांडारकरांनाहि प्रखर टीकेला तोंड द्यावे लागले.

भांडारकर राजकारणात प्रत्यक्ष कधीहि गुंतलेले नसले तरी ते त्यापासून पूर्णपणे अलिप्तहि नव्हते. 'बाँबे असोसिएशन' व 'डेक्कन सभा' यांचे ते सभासद होते आणि डब्ल्यू. एस. केन यांच्या मद्यपानविरोधक चळवळीला त्यांनी पूर्ण पाठिंबा व सहकार्य दिले होते. १८८५ व १८८९ मध्ये 'इंडियन नॅशनल काँग्रेस'च्या बैठकींनाहि ते हजर राहिले. दक्षिण आफ्रिकेतील ब्रिटिश भारतीयांच्या गाऱ्हाण्यांच्या निमित्ताने जेव्हा महात्मा गांधी पुण्याला आले तेव्हा भांडारकरांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या सभेपुढे त्यांनी भाषण केले. सर्व वर्गांतील लोकांना भांडारकरांबद्दल अतिशय आदर वाटत होता आणि भांडारकर तटस्थ पक्षाचे म्हणून समजले जात. गांधीजींच्या आत्मचरित्रातल्या पुढील उताऱ्यावरून याचे उत्तम उदाहरण मिळते :—

"प्रथम मी लोकमान्य टिळकांना भेटलो, ते म्हणाले, दक्षिण आफ्रिकेतल्या प्रश्नाबाबत मतभेद होऊ शकत नाही. पण तुम्ही अध्यक्ष म्हणून

तटस्थ माणूस निवडायला हवा. प्रा. भांडारकरांना भेटा. ते हल्ली कुठल्याहि सार्वजनिक चळवळीत भाग घेत नाहीत. पण या प्रश्नामुळे त्यांचे मनोगत कदाचित कळू शकेल. त्यांना भेटा व ते काय म्हणतात ते मला कळवा."

पित्याच्या जिव्हाळ्याने डॉ. भांडारकरांनी माझे स्वागत केले. मी त्यांच्याकडे गेलो तेव्हा दुपार होती. या वेळेला मी माणसांना भेटण्यात गुंतलेला असे ही गोष्टच त्या अश्रांत विद्वानाला फार पसंत पडली आणि सभेच्या अध्यक्षस्थानासाठी तटस्थ माणसाच्या माझ्या आग्रहाला ताबड-तोब मान्यता मिळाली.

माझे ऐकून घेतल्यानंतर ते म्हणाले : 'मी राजकारणात भाग घेत नाही हे तुम्हाला कोणीहि सांगेल. पण मी तुम्हाला नकार देऊ शकत नाही. तुमची बाजू इतकी भक्कम आहे आणि तुमचे कार्य इतके प्रशंसनीय आहे की तुमच्या सभेत भाग घेण्याचे मी नाकारू शकत नाही. तुम्ही टिळक व गोखले यांचा विचार घेतलात हे चांगले झाले. या दोन सभांच्या जोड–आश्रयाखाली भरणाऱ्या सभेचे अध्यक्षस्थान स्वीकारण्यात मला आनंद होईल असे त्यांना सांगा. सभेची वेळ माझ्या म्हणण्याप्रमाणे ठर-विण्याची जरूर नाही. त्यांना सोयीची असलेली कोणतीहि वेळ मला सोयीची होईल."[१]

इ. स. १८८६ मध्ये भांडारकर, जोसेफ चेंबरलेन यांना भेटले आणि त्यांना ठासून सांगितले की भारताच्या राज्यकारभाराची अंतिम जबाब-दारी ब्रिटिश संसदेवर, पर्यायाने तिच्या प्रत्येक सभासदावर आणि विशेषतः वेगवेगळ्या पक्षांच्या पुढाऱ्यांवर आहे.

इ. स. १९०४ साली लॉर्ड कर्झनचे 'भारतीय विद्यापीठ विधेयक' मंजूर करण्याच्या वेळी, सरकारच्या भूमिकेला, विधानसभेचे एक सभासद म्हणून भांडारकरांनी पाठिंबा दिला. यातून कठोर वादंग माजले.

---

१. मोहनदास करमचंद गांधी, 'ॲन ऑटोबायॉग्राफी,' नवजीवन पब्लिशिंग हाऊस, पृष्ठ १३३-३४

फिरोजशहा मेहता, लोकमान्य टिळक व गोखल्यांनीहि या मुद्यावर ठाम मते मांडली. भांडारकर ब्रिटीशांवर नाराज असूनहि आणि वैयक्तिक कारणांसाठी अनेक प्रसंगी त्यांच्यावर टीका करूनहि (एका भारतीय क्रांतिकारकाने मि. रँड या ब्रिटिश अधिकाऱ्याचा खून केला तेव्हा त्याच्या अंत्ययात्रेला हजर राहण्याची परवानगी भांडारकरांना दिली गेली नव्हती. तसेच महाराष्ट्रीय पगडी घालण्याच्या त्यांच्या आग्रहामुळे त्यांना 'दिल्ली दरबार'लाहि हजर राहू दिले नव्हते.) पाश्चात्य व पौर्वात्य शिक्षणाने घडविलेल्या भांडारकरांची ब्रिटीश लोकांच्या न्यायीपणावर दृढ श्रद्धा होती. व त्या साम्राज्याच्या एकात्मतेला धक्का लावण्याच्या उद्देशाने केलेल्या कोणत्याहि हालचालीला त्याचा विरोध होता हे नाकारता येणार नाही. आपल्या काही व्याख्यानांतून त्यांनी राजकीय विचारांचा निर्देश केलेला असला तरी तो इतका वरवरचा आहे की त्यावरून त्यांचे असे विशिष्ट राजकीय तत्त्वज्ञान निश्चित करता येणार नाही.

भांडारकरांच्या धार्मिक व पारंपारिक मतांचा त्यांच्या विचारसरणी-वर फार मोठा परिणाम झालेला होता. ब्रिटिश क्रांति ज्या क्रमशः पद्धतीने झाली तिची ते फार प्रशंसा करीत, व भूतकाळाशी पूर्णपणे संबंध तोडून टाकण्याच्या, फ्रेंचांनी पत्करलेल्या, पद्धतीपेक्षा, ती त्यांना जास्त पटे.

भांडारकरांनी राजकारणात सक्रीय भाग घेतला नाही, तरी इतर क्षेत्रांत त्यांनी आपल्या लोकांसाठी फार मोठी कामगिरी बजावली. त्यांचे उदात्त चरित्र, तरुण पिढीला उत्कर्षाची संधी मिळवून देण्याची त्यांची ठाम व कळकळीची इच्छा व अभ्यासाचे विलक्षण प्रेम, यामुळे भांडार-करांचे आयुष्य आजहि स्फूर्तिदायक ठरेल.

मूलतः धार्मिक वृत्तीचे प्रार्थनासमाजी व सरकारी नोकर असल्यामुळे राजकीय किंवा सामाजिक चळवळींत स्वतंत्रपणे भाग घेण्याची त्यांना काही इच्छा असल्याचे दिसले नाही. तरी त्यांचा आदर्शवाद व साधुवृत्ति, यांनी पुढच्या लोकांसाठी उदाहरण घालून दिले. बौद्धधर्मात आपल्या

थोर धर्मोपदेशकांच्या स्मरणार्थ स्तूप बांधण्याची पद्धत आहे. भांडारकरांच्या मर्त्य अवशेषांवर एक स्तूप [१] उभारला गेला आहे. पण या थोर पौर्वात्य विद्वानाचे जिवंत स्मारक म्हणजे पुण्यातील 'भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिटय़ूट' होय.

---

१. कर्नाटकी, डॉ. भांडारकर यांचे चरित्र, प्रस्तावना पृ० १२

# त्यांच्या रोजनिशीतील काही पाने

१–१–१८८९

" ईश्वरा, माझी तुझ्यावरील श्रद्धा बळकट कर, म्हणजे मी निर्भयपणे तुझ्या मार्गावर वाटचाल करू शकेन. मी केवळ तुलाच अनुसरू दे. पोकळ डौलापासून मला मुक्त ठेव म्हणजे माणसांच्या निंदकांचा मला वारा लागणार नाही. मी स्वतःबद्दल अभिमान बाळगावा असे माझ्यात काय आहे ? "

१–१–१८९९

" आणखी एक वर्ष उलटले. ईश्वरा, मला मदत कर ! मला तुझा बनव. तुझ्याबद्दल व तुला आवडणाऱ्या कामांबद्दल मला खूप प्रेम वाटू दे. कितीहि अल्पप्रमाणात का होईना पण तुझ्या निर्मितीत माझा उपयोग व्हावा ही माझ्या मनातील उत्कट इच्छा आहे. कारण याच एका मार्गाने तू माझा स्वीकार करशील असे मला वाटते, केवळ माझ्या स्वतःसाठी जगण्याने नव्हे. "

१४–१–१८९९

" खरोखर प्रत्येकाने नेहमी स्वतःच्या अंतःकरणाची सूक्ष्मपणे परीक्षा केली पाहिजे आणि प्रार्थना व दृढनिश्चय यांच्या साह्याने, छुप्या अहंकारामुळे निर्माण झालेल्या भावना व सवयी यांचे निर्मूलन करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. नाही तर प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे मानसिक दुर्बलता आली की ते आपल्यावर हल्ला करतील. थोर ईश्वरा, खरोखर मला दुसऱ्यांच्यात जो दुबळेपणा आढळतो त्यापासून माझे रक्षण कर. मला माझ्या दोषांकडे उघडया डोळ्यांनी पाहू दे, आणि ते नाहीसे करण्यास मला मदत कर. "

२१–१–१८९९

" माझ्या रोजनिशीची तपासणी केली. मला खेद होतो. त्यात मी पुढे

लिहिले नाही कारण स्वत:च्या मागील कृत्यांच्या व अनुभवांच्या चिंतनाचा एक विशिष्ट उदात्त परिणाम होतो. आपल्या समग्र भूतकाळाचे चिंतन करताना ईश्वराचे अस्तित्व व मार्गदर्शित्व दिसते. मात्र तो वर्तमान असताना यांची जाणीव नसते." [१]

१. कर्नाटकी, डॉ. भांडारकर यांचे चरित्र, पृष्ठे ८२—८३, ३८६ व ३८७

## ग्रंथसूची

रामकृष्ण गोपाळ भांडारकरांसारख्या थोर विद्वानाच्या जीवन चरित्राच्या अभ्यासासाठी अनेक पुस्तके आहेत. विशेष महत्त्वाची काही अशी :–


१. त्यांच्या विद्यार्थ्यांनी लिहीलेली दोन मराठी चरित्रे :

(अ) द्वारकानाथ गोविंद वैद्य यांचे **रामकृष्ण गोपाळ भांडारकर** १९१९ मुंबई.

(ब) श्रीनिवास नारायण कर्नाटकी यांचे '**गुरुवर्य डॉ. भांडारकर यांचे चरित्र**' १९२७, पुणे.

२. (अ) त्यांचे संग्रहित ग्रंथ (चार खंडात), भांडारकर ओरिएंटल रिसर्च ग्रंथ इन्स्टिटयूट, पुणे, यांनी प्रकाशित केलेले.

(ब) **रामकृष्ण गोपाळ भांडारकर ह्यांचे धर्मपर लेख व व्याख्याने,** प्रस्तावना चंदावरकर, संपादक द्वा. गो. वैद्य, १९१९, मुंबई.

३. भांडारकरांचे जीवन व लेखनविषयक अभ्यास

(अ) **एमिनंट ओरिएंटॅलिस्टस्** जी. ए. नटेसन, मद्रास,

(ब) **अर्वाचीन चरित्रकोश**, सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, १९४६, पुणे, पृष्ठे ४८१–८३.

(क) मॉडर्न हिस्टोरियन्स ऑफ एनशंट इंडिया, ए. एल बॅशम (स्टडीज् इन इंडियन हिस्टरी अँड कल्चर, कलकत्ता, १९६४, पृष्ठे २२०–२१)

(ड) आजकालचा महाराष्ट्र, पाध्ये व टिकेकर, मुंबई, १९३५, पृष्ठे १३३–३८.

## भारत-देश आणि लोकग्रंथमाला
## प्रकाशित झालेली पुस्तके

| | | जनता आवृत्ती | ग्रंथालय आवृत्ती |
|---|---|---|---|
| फुलणारे वृक्ष | ...डॉ. एम. एस. रंधावा | ६·५० | ९·५० |
| आसामी साहित्य | ...प्रा. हेम बरुआ | ५·०० | ७·५० |
| परिचित वृक्ष | ...डॉ. एच. संतापाऊ | ५·२५ | ८·२५ |
| भारतीय सर्प | ...डॉ. पी. जे. देवरस | ६·५० | ९·५० |
| जमीन आणि माती | ...डॉ. एस पी. रायचौधरी | ५·२५ | ८·२५ |
| भारतीय खनिजे | ...श्रीमती मेहर डी. एन. वाडिया | ५·२५ | ८·२५ |
| पाली व प्राणी | ...प्रा. हरबन्स सिंग | ४·२५ | ८·०० |
| अरण्ये व अरण्यरक्षण | ...प्रा. के. पी. सगरैय्या | ५·२५ | ८·५० |
| राजस्थानचा भूगोल | ...डॉ. व्ही. सी. मिश्र | ६·०० | ८·२५ |
| उपवन-पुष्प | ...डॉ. विष्णु स्वरूप | ६·०० | ९·५० |
| लोकसंख्या | ...डॉ. एस. एन. अग्रवाल | ३·७५ | ७·०० |
| निकोबार बेटे | ...श्री. के. के. माथुर | ५·५० | ९·०० |
| भारतीय पक्षी | ...डॉ. सलीम अली व श्रीमती लाइक फतेहअली | ९·०० | १५·०० |
| भाजीपाला | ...डॉ. बी. चौधरी | ५·२५ | ८·२५ |
| भारताचा भौतिक भूगोल | ..प्रा. सी. एस. पिचामुथू | ५·२५ | ८·२५ |
| औषधी वनस्पती | ...प्रा. एस. के. जैन | ५·७५ | ९·०० |
| पश्चिम बंगालचा भूगोल | ..प्रा. एस. सी. बोस | ६·०० | ९·०० |
| भारताचे भूगर्भशास्त्र | ...डॉ. ए. के. डे | ५·२५ | ८·५० |

| | | जनता आवृत्ती | ग्रंथालय आवृत्ती |
|---|---|---|---|
| **मोसमी वारे** | ...डॉ. पी. के. दास | ४·२५ | ७·५० |
| **राजस्थान** | ...डॉ. धर्मपाल | ४·५० | ७·७५ |
| **भारत–एक सर्वसाधारण पाहणी** | ...डॉ. जॉर्ज कुरियन | ६·०० | ९·५० |
| **आसामी-टोळचा** | ...श्री. एस. बार्कटकी | ४·७५ | ८·०० |
| **आसाम** | ...श्री. एस. बार्कटकी | ४·७५ | ८·०० |
| **उत्तर भारतीय मंदिरे** | ...श्री. कृष्ण देव | ४·०० | ७·५० |
| **रोपट्यांचे रोग** | ...डॉ. आर. एस. माथुर | ४·७५ | ८·०० |
| **फळे** | ...प्रा. रणजित सिंग | ५·७५ | ९·२५ |
| **पिकांचे शत्रू** | ...डॉ. एस. प्रधान | ७·५० | ११·०० |
| **भारतीय नाणी** | ...डॉ. परमेश्वरी लालगुप्त | ६·७५ | ९·५० |
| **आसामचा भूगोल** | ...डॉ. एच. पी. दास | ६·०० | ९·०० |
| **भारतीय रंगचित्रे** | ...डॉ. सी. शिवराममूर्ती | ७·०० | ११·०० |
| **भारतातील नद्या** | ...डॉ. एस. डी. मिश्रा | ६·५० | ९·५० |
| **गुजरातचा भूगोल** | ...डॉ. के. आर. दीक्षित | ९·२५ | १२·५० |
| **मासे** | ...डॉ. (कु.) एम. चंडी | ६·०० | ९·०० |
| **भारताचा आर्थिक भूगोल** | ...प्रा. व्ही. एस. गणनाथन | ५·२५ | ८·२५ |

(इतर भाषांमधील आवृत्त्या तयार होत आहेत.)

## राष्ट्रीय चरित्रमालेत प्रकाशित झालेली पुस्तके

| | लेखक | रुपये |
|---|---|---|
| १. गुरू गोविंदसिंग | ...डॉ. गोपाल सिंग | २·०० |
| २. गुरू नानक | ...डॉ. गोपाल सिंग | २·२५ |
| ३. कबीर | ...डॉ. पारसनाथ तिवारी | १·७५ |
| ४. रहीम | ...डॉ. समर बहादूर सिंग | २·०० |
| ५. महाराणा प्रताप (हिंदी) | ...श्री. आर. एस. भट्ट | १·७५ |
| ६. अहिल्याबाई | ...श्री. हिरालाल शर्मा | २·२५ |
| ७. त्यागराज | ...प्रा. पी. सांबमूर्ती | २·०० |
| ८. पं. भातखंडे | ...डॉ. एस. एन. रातंजनकर | १·२५ |
| ९. पं. विष्णु दिगंबर | ...श्री. व्ही. आर. आठवले | १·२५ |
| १०. शंकरदेव | ...डॉ. महेश्वर नियोग | २·०० |
| ११. राणी लक्ष्मीबाई (हिंदी) | ...श्री. वृंदावनलाल वर्मा | १·७५ |
| १२. सुब्रह्मण्य भारती | ...डॉ. (सौ.) प्रेमा नंदकुमार | २·२५ |
| १३. हर्ष | ...श्री. व्ही डी. गांगल | १·७५ |
| १४. समुद्रगुप्त | ...डॉ. लल्लनजी गोपाल | २·०० |
| १५. चंद्रगुप्त मौर्य | ...डॉ. लल्लनजी गोपाल | १·७५ |
| १६. काझी नझरुल इस्लाम | ...श्री. बसुधा चक्रवर्ती | २·०० |
| १७. शंकराचार्य | ...प्रा. टी. एम. पी. महादेवन् | २·०० |
| १८. अमीर खुश्रू | ...श्री. सैयद गुलाम समनानी | १·७५ |
| १९. नाना फडणवीस | ...डॉ. वाय. एन. देवधर | १·७५ |
| २०. रणजितसिंग | ...श्री. डी. आर. सूद | २·०० |
| २१. हरी नारायण आपटे | ...श्री. एम्. ए. करंदीकर | १·७५ |

| | लेखक | रुपये |
|---|---|---|
| २२. **मुथ्थुस्वामी दीक्षितार** | ...जस्टिस टी. एल. वेंकटराम | २·०० |
| २३. **मिर्झा गालिब** | ...श्री. मलिकराम | २·०० |
| २४. **रामानुजाचार्य** | ...श्री. आर. पार्थसारथी | २·०० |
| २५. **ईश्वरचंद्र विद्यासागर** | ...श्री. एस. के. बोस | २·०० |
| २६. **सूरदास (हिंदी)** | ...श्री. व्रजेश्वर वर्मा | १·७५ |
| २७. **स्वामी दयानंद** | ...डॉ. बी. के. सिंग | २·५० |
| २८. **मोतिलाल घोष** | ...श्री. एस. एल. घोष | २·७५ |
| २९. **श्यामा शास्त्री** | ...(श्रीमती) विद्या शंकर | २·०० |
| ३०. **जगदीशचंद्र बोस** | ...श्री. एस. एन. बसू | २·०० |
| ३१. **स्वामी रामतीर्थ** | ...श्री. डी. आर. सूद | २·५० |
| ३२. **चैतन्य** | ...श्री. दिलीपकुमार मुखर्जी | २·५० |
| ३३. **श्री. रा. गो. भांडारकर** | ...डॉ. एच. ए. फडके | १·७५ |

( विविध भाषांतील अन्य पुस्तके छापून तयार होत आहेत. )